॥ श्री विठ्ठल ॥

सकल संत गाथा खंड पहिला

# श्री ज्ञानदेव महाराज

यांच्या

# अभंगांचा गाथा

( श्री निवृत्तिनाथ, सोपानदेव, मुक्ताबाई व चांगदेव
यांच्या अभंगांसह )

वै. ह. भ. प. साखरे महाराज

यांच्या प्रतीवरून अभंग तपासून शुद्ध केले आहेत

— प्रकाशक —

दिगंबर हरि तेलंग, बुकसेलर्स, पंढरपूर

१९५४ ( किंमत ३–८–०

॥ श्री विठ्ठल ॥

सकल संत गाथा खंड पहिला

# श्री ज्ञानदेव महाराज

यांच्या

## अभंगांचा गाथा

( श्री निवृत्तिनाथ, सोपानदेव, मुक्ताबाई व चांगदेव
यांच्या अभंगांसह )

वै. ह. भ. प. साखरे महाराज

यांच्या प्रतीवरून अभंग तपासून शुद्ध केले आहेत

— प्रकाशक —

दिगंबर हरि तेलंग, बुकसेलर्स, पंढरपूर

नवीन आवृत्ति )　　१९५४　　( किंमत ३-८-०

# विषयानुक्रमणिका

# प्रस्तावना

साक्षरताप्रसार व प्रौढशिक्षण यांची आवश्यकता आतां निर्विवाद झाली आहे. त्याकरितां सरकारनें प्रौढांकरितां पाठ तयार करण्याचे 'कारखाने' जागोजागीं स्थापन केले आहेत. त्या कारखान्यांत समाजाचें प्रापंचिक भाग्य सद्यपरिस्थितींत कसें उदयास आणावें व समाजानें तें कसें उपभोगावें याचे पाठ अवश्य येतीलच व समाजाचें पारमार्थिक कल्याण म्हणजे अध्यात्म व त्यावर आधारलेली नीति यांचेही पाठ देण्यांत येतील. अध्यात्मावर आधारलेले पाठ पूर्वपरंपरा व सनातन मानवधर्म ( Humanity ) यांना मिळतेजुळते घेऊन लिहावयाचे असल्यानें महाराष्ट्रांतील संतमहंतांनीं आपापल्या कालाला योग्य असें [illegible] सोपें साधन म्हणून जें अभंग-वाङमय निर्माण केलें त्याचा अत्यंत उपयोग होणार आहे.

श्री. तेलंग, बुकसेलर, पंढरपूर, यांनीं संतांच्या अभंग गाथ्यांचीं पुनर्मुद्रणें करून महाराष्ट्रांतील सर्व ठिकाणीं पाठविण्याचा जो प्रयत्न चालविला आहे तो अगदीं समयोचित आहे. नुकत्याच साक्षर झालेल्या प्रौढांना गाथा वाचणें फार सोपें जाईल, कारण गाथ्यांतील अभग गांवोगांव पसरलेल्या भजनमंडळींच्या मुखोद्गत झालेले आहेत. त्या अभंगांतून दिलेले नीतिपाठ सहाशें वर्षें बहुजन समाजानें आत्मसात केले आहेत. ते पाठ आतां अक्षररूपानें त्यांच्यापुढें आल्यानें त्या प्रौढांची वाचनाची गोडी आपोआपच वाढेल व नवसाक्षरांना त्यांची साक्षरता टिकविण्याकरितां "काय करावें" हा प्रश्न सुलभतेनें सुटेल.

श्री ज्ञानेश्वर महाराज यांनीं अभंग–वाङमय कोणत्या हेतूनें लिहिलें याबद्दल डॉ. तुळपुळे म्हणतात—

"सर्वसामान्य बहुजनसमाजास ज्ञानश्वरीचें हृद्गत कळणें कठीण आहे. त्याची जाणीव ज्ञानेश्वरांना असल्यानें त्यांनीं ज्ञानेश्वरींत आलेली नीतिमीमांसा अभंगवाणींतून पुन: व्यक्त केली आहे. त्यांचा हेतु असा कीं, बहुजनसमाजाच्या सर्व थरांत अध्यात्म-नीति मुरावी.

त्या अभंगांचा प्रसार कीर्तन–भजनद्वारां सर्व महाराष्ट्रभर झाला व त्या नीतीचा ठसा बहुजनसमाजावर उमटला."

संतांच्या अभंगांतून दिलेले नीतिपाठ हे संकुचित भूमिकेवरून दिलेले नाहींत. सर्व मानवजातीतील विश्वबंधुत्व किंबहुना सर्वाभूति–भगवत्भाव अशा अत्यंत विशाल भूमिकेवरून दिलेले असल्यानें सत्याच्या एकत्वाच्या कल्पनेशी ते विसंगत नाहीत. ते विश्वनीति होण्याच्या किमतीचे आहेत. नमुन्यादाखल अभंगांतील कांही उपदेश बघा —

(१) नरजन्मास येऊन आत्म्याचें स्वराज्य मिळवावें आणि " उभारलेनि सिडे। जेथ स्वराज्य तारूं न बुडें। ऐसे घडे वाड मोडे। तेचि कीजे॥

(२) आत्मज्ञानावाचून सर्व व्यर्थ असून त्या आत्मज्ञानास मंत्रतंत्रादि बाह्योपायांपेक्षां अंतःकरण-शुद्धीच अत्यावश्य आहे.

(३) चित्त सुचित्त होऊन विषय मनांतून सुटला पाहिजे. " वनीं जाऊन वनिता चिंतिली " तर सारें तपच व्यर्थ जाणार !

(४) मुख्य मनःशुद्धि हवी व ती हरिचिंतनाशिवाय कोणत्याही अन्य उपायांनी मिळणार नाहीं.

(५) तीर्थे हिंडून, दगडाचे देव पुजून, सोवळें पाळून काय लाभ ? दगडाचा देव डोक्यावर घातला तर [illegible] मात्र होईल.

(६) विश्वात्मक देव सर्वत्र पसरला असतांना झुळझुळींत धोतरें, देवतार्चनाचा पसारा व दिवसाची दहा सोंवळी कशास पाहिजेत ?

(७) घरदार, आईबाप, भाऊबहिणी हीं सर्व खोटी म्हणून त्यजिण्यापेक्षां अहंकार, अविद्या, कामक्रोधमदमत्सर, आशातृष्णा यांचा त्याग करावा.

(८) संसार यात्रेंत सर्वत्र अधर्माचा व्यवहार चालू असून विषयाच्या दावणीनें भ्रांत झालेला प्रत्येक प्राणी देवाच्या ठायीं मात्र विन्मुख आहे. अहंभावाचा बाजार भरला आहे. त्यांत कोणी 'मीपणा' च्या गोण्या भर चव्हाटयावर मांडल्या आहेत; कोणी आपली प्रतिष्ठा गाढवावर भरली आहे; कोणी पंडितपण मिरवीत आहे, तर

कोणी ज्ञान विकून पोट भरीत आहेत. सर्वजण अज्ञान भ्रांतीचीं पोतीं भरून 'सुवस्तु सांडून कुवस्तु' घेत आहेत. स्वधर्म सांडून परधर्म आचरीत आहेत. देव त्यांच्याजवळ असून हे त्याच्या शोधार्थ दाही दिशा हिंडत आहेत. आत्महिताची शुद्ध कोणालाच नाहीं.

(९) एका ज्ञान प्रतीतीविण सर्व ज्ञानव्युत्पत्ति व्यर्थ.

लोकांना वरील पाठांचा उलगडा होण्याकरतां महाराष्ट्राचा गेल्या सहाशें वर्षांचा इतिहास थोडक्यांत सांगितला पाहिजे. सध्याचे लोक म्हणतील, " प्रथम आम्हांला अन्न, वस्त्र, रहाण्याची जागा व करमणुकीचीं साधनें द्या. आध्यात्म नीतीचें आमचें आम्ही बघून घेऊं " श्री शिवाजी महाराजांच्या पूर्वकाळींही लोक असेंच म्हणत ' येक म्हणत सांडा गोठी । आधी पाहिजे रोटी । मग करावी चांउटी । सावकाश ॥ ' वरवर पाहिलें असतां वरील म्हणणे बरोबर आहे असें वाटण्याचा संभव आहे. पण मानवी स्वभाव व मागील इतिहास पाहिला तर आपणास समजून येईल कीं खाद्यपदार्थ, रहाण्याची जागा व करमणुकीचीं साधनें मिळालीं असूनहि अध्यात्म–नीति आपोआपच उत्पन्न होईल असें म्हणणें खरें नाहीं. श्री ज्ञानेश्वराचे वेळी स्वराज्य होतें. रामदेव रायासारखा राजा होता. महाराष्ट्रांत सर्व प्रकारची सुखसंपत्ति नांदत होती बाह्यातकारी भाग्यश्री दिसत होती. पण त्याच वेळीं सामाजिक मनांत विषमज्वराचीं बीजें रुजत होतीं. वैषम्य, दुजाभाव, मत्सर, ढोंगीपणा, खोट्या ज्ञानाचा व्यापार, गंडा–बांधण्याचें गुरुत्व, मंत्रतंत्रादि थातूरमातूर इत्यादि मानसिक रोगांनीं समाजाचें डोकें फिरावयास लागलें होतें. याची पूर्ण जाणीव भवरोग वैद्य किंवा धन्वंतरी ज्ञानेश्वर महाराज यांना झाली होती व त्यांनीं समाजाचा शरीरनाश टाळण्या करताच, भक्तीचा काढानिकाढा, भावार्थ दीपिका व अभंगपाठ या रूपानें द्यावयास सुरुवात केली. पण यानंतर थोड्याच वर्षांनीं त्यांनीं समाधि घेतली व वरील औषधांचा सुपरिणाम व्हावयास लागण्याच्या पूर्वींच उ रेकडून नवज्वराची ( Muslim aggression ) लाट आली व महाराष्ट्राचें शरीर व मन हीं विकलांग होऊन गेलीं. रोग वाढतच गेला. भक्तीचा काढा चालूच होता पण रोग हटण्याचें चिन्ह दिसेना. सोळावे शतकांत तर रोग वाढण्याची परिसीमा झाली. त्या वेळचें वर्णन बघा—

पदार्थ तितुका गेला । नुसता देशचि उरला ।
येणेकरतां बहुताला कष्ट झाले ।।
लोकस्थान भ्रष्ट झाले । कित्येक तेथेच मेली ।
उरली ती मराया आली । गांवावरी ।।
माणसा खावया अन्न नाहीं । आंथरुण पांघरुण तेही नाहीं ।
घर करावया सामग्री नाही । काय करिती ।।
कांहींच पहातां घड नाहीं । विचार सुचेना कांहीं ।
अखंड चिंतेच्या प्रवाहीं । पडले लोक ।।
प्राणिमात्र जाहलें दुःखी । पाहता कोणी नाहीं सुखी ।
कठीण काळे ओळखी । धरीनात कोणी ।।

उदड चाकरी, चाकरी, मिळेना भाकरी ।।
लोक निलंड निलंड, काढुनी नेती पोरीं ।। १ ।।
पैक्या कारणें कारणें, होते मारामारी ।
लोक भलेसे दिमती । खेटरे चोरिती ।
वस्त्रें, धोतरें, पात्रें । लपवुनी पळविती ।। २ ।।

शिवपूर्व कालांतील समाजाची स्थिति वरील प्रकारची होती व आतांची परिस्थिति अगदी तशीच आहे. मतमतांतराचा गलबला; वाताची बडबड सुरूच होती. त्यावेळचे भवरोग वैद्य व राजवैद्य यांनी परस्पर विचार-विनिमय केला व निश्चित उपाय ठरविला. आताही आपणास तसाच निश्चित उपाय ठरविला पाहिजे.

प्रपंचीं तें भाग्य । परमार्थीं वैराग्य
दोहीकडे सांग । होता तो समर्थ ।।

प्रपंच व परमार्थ हे चांगल्या तऱ्हेनें होतील तरच देश समर्थ होईल नाहींतर—

नाहीं तरी व्यर्थ तारंबळी ।
तारंबळी होती । विचार नसता ।।

या दोन्हीं गोष्टींचा योग्य विचार झाला नाहीं तर तारंबळ होणारच; तेव्हां--

दास म्हणे आतां सावधान ।

वरील विचार ठरल्याबरोबर श्री तुकाराम महाराजांनीं ज्ञानेश्वरापासून चालत आलेले अध्यात्मनीतीचे पाठ सुरू केले. शिवरायांनी जालीम मात्रेचा वळसा देऊन घाम काढला व नवज्वराला महाराष्ट्राच्या सीमेपार केला. महाराष्ट्राची सुस्थिति पुढें ५० वर्षे टिकली व पुन: विषमज्वरानें त्यास घेरले व पुन: नवज्वर ( Foreign aggression ) झाला. वरील सहाशें वर्षांच्या इतिहासावरून महाराष्ट्राच्या प्रकृतीला विषमज्वर व त्यांतूनच उद्भवणारा नवज्वर यांची खोडी लागलेली दिसते. या रोगांचा कायमचा बिमोड करावयाचा असल्यास ज्ञानेश्वरादि संताचे अध्यात्मिक नीतिपाठ व त्याबरोबरच श्री शिवरायांचे राजनीतिपाठ सारखे देत राहणें याची फार जरुरी आहे. आणि याच करितां साक्षर झालेल्या प्रौढ लोकांत अभंगगाथांचा प्रसार होणें अत्यावश्यक आहे. आतांचे पुढाऱ्यावर सद्यस्थितीनुरूप पाठ देण्याची जबाबदारी येऊन पडली आहे व महाराष्ट्राची भाग्यश्री मिळविण्यासाठीं वरील दोन्ही उपायांची योग्य सांगड ते घालतील अशी आशा आहे,

पुणें

वसंतराव शिर्के

॥ श्री विठ्ठल प्रसन्न ॥

# श्री ज्ञानदेव गाथा



## भाग १ ला.

### मंगलाचरण.

१ आरंभी आवडीं आदरें आलें नाम । तेणें सकळ सिद्धि जगीं जालें पूर्ण काम ॥ १ ॥ रामकृष्ण गोविंद गोपाळा । तूं माय माउली जिवां जिव्हाळा ॥ २ ॥ तूझियेनि नामें सकळ संदेहो फिटला । बापरुखमादेविवरा विठ्ठला ॥ ३ ॥

२ सकळ मंगळनिधी । श्री विठ्ठलाचें नाम आधीं ॥ १ ॥ म्हण कां रे म्हण कां रे साचे । श्रीविठ्ठलाचें नाम वाचें ॥ २ ॥ पतितपावन साचे । श्रीविठ्ठलाचें नाम वाचें ॥३॥ बापरखुमादेविवरु साचे । श्रीविठ्ठलाचें नाम वाचें ॥ ४ ॥

३ रूप पाहतां लोचनीं । सुख जालें वो साजणी ॥ १ ॥ तो हा विठ्ठल बरवा । तो हा माधव बरवा ॥ २ ॥ बहुतां सुकृतांची जोडी । म्हणुनि विठ्ठलीं आवडी ॥ ३ ॥ सर्व सुखाचें आगरू । बापरखुमादेविवरू ॥ ४ ॥

### हरिपाठाचे अभंग

४ देवाचिया द्वारीं उभा क्षणभरी । तेणें मुक्ति चारी साधियल्या ॥१॥ हरि मुखें म्हणा हरि मुखें म्हणा । पुण्याची गणना कोण

करी ॥ २ ॥ असोनी संसारीं जिव्हे वेगु करी । वेदशास्त्र उभारी बाह्या सदा ॥ ३ ॥ ज्ञानदेव म्हणे व्यासाचियें खुणें । द्वारकेचे राणे पांडवां घरीं ॥ ४ ॥

५ चहूं वेदीं जाण साही शास्त्रीं कारण । अठराही पुराणें हरिसी गाती ॥ १ ॥ मथुनि नवनीता तैसें घे अनंता । वायां व्यर्थ कथा सांडीं मार्गु ॥ २ ॥ एक हरि आत्मा जीवशिवसमा । वांया तूं दुर्गमा न घालीं मन ॥ ३ ॥ ज्ञानदेवा पाठ हरि हा वैकुंठ । भरला घनदाट हरि दिसे ॥ ४ ॥

६ त्रिगुण असार निर्गुण हें सार । सारासार विचार हरिपाठ ॥ १ ॥ सगुण निर्गुण गुणाचें अगुण । हरिवीण मन व्यर्थ जाय ॥ २ ॥ अव्यक्त निराकार नाहीं त्या आकार । जेथोनि चराचर हरिसी भजे ॥ ३ ॥ ज्ञानदेवा ध्यानीं रामकृष्ण मनीं । अनंत जन्मोनी पुण्य होय ॥ ४ ॥

७ भावेंवीण भक्ति भक्तिवीण मुक्ति । बळेंवीण शक्ति बोलूं नये ॥ १ ॥ कैसेंनि दैवत प्रसन्न त्वरीत । उगा राहे निवांत शिणसी वांया ॥ २ ॥ सायास करिसी प्रपंच दिननिशीं । हरीसी न भजसी कवण्या गुणें ॥ ३ ॥ ज्ञानदेव म्हणे हरिजप करणें । तुटेल धरणें प्रपंचाचें ॥ ४ ॥

८ योग याग विधी येणें नव्हे सिद्धी । वांयाचि उपाधी दंभ धर्म ॥१॥ भावेंवीण देव न कळे निःसंदेह । गुरुवीण अनुभव कैसा कळे ॥२॥ तपेंवीण दैवत दिधल्यावीण प्राप्त । गुजेंवीण हित कोण सांगे ॥ ३ ॥ ज्ञानदेव सांगे दृष्टांताची मात । साधूचे संगती तरणोपाय ॥ ४ ॥

९ साधु बोध झाला निरोनिया ठेला । ठायींच मुराला अनुभव ॥१॥ कापुराची वाती उजळली ज्योती । ठायींच समाप्ती झाली जैशी ॥ २ ॥ मोक्ष रेखे आला भाग्यें विनटला । साधूंचा अंकिला हरिभक्त ॥ ३ ॥ ज्ञानदेवा गोडी संगती सज्जनीं । हरि दिसे जनीं वनीं आत्मतत्त्वीं ॥ ४ ॥

१० पर्वताप्रमाणें पातक करणें । वज्रलेप होणें अभक्तांसी ॥ १ ॥ नाहीं ज्यासी भक्ति तो पतित अभक्त । हरिसी न भजत दैवहत ॥ २ ॥ अनंत वाचाळ बरळती बरळ । त्या कैसेनि गोपाळ पावे हरि ॥ ३ ॥ ज्ञानदेवा प्रमाण आत्मा हा निधान । सर्वांघटीं पूर्ण एक नांदे ॥ ४ ॥

११ संतांचे संगती मनोमार्ग गती । आकळावा श्रीपती येणें पंथें ॥ १ ॥ रामकृष्ण वाचा भाव हा जिवाचा । आत्मा जो शिवाचा रामजप ॥ २ ॥ एकतत्त्व नाम साधिती साधन । द्वैताचें बंधन ना बाधिजे ॥ ३ ॥ नामामृत गोडी वैष्णवां लाधली । योगियां साधली जीवनकळा ॥ ४ ॥ सत्वर उच्चार प्रल्हादीं बिंबला । उद्धवा लाधला कृष्णदाता ॥ ५ ॥ ज्ञानदेव म्हणे नाम हें सुलभ । सर्वत्र दुर्लभ विरळा जाणें ॥ ६ ॥

१२ विष्णुवीण जप व्यर्थ त्याचें ज्ञान । रामकृष्णीं मन नाहीं ज्याचें ॥ १ ॥ उपजोनी करंटा नेणें अद्वैत वाटा । रामकृष्णीं पैठा कैसेंनि होय ॥ २ ॥ द्वैताची झाडणी गुरुवीण ज्ञान । तया कैचें कीर्तन घडेल नामीं ॥ ३ ॥ ज्ञानदेव म्हणे सगुण हें ध्यान । नामपाठ मौन प्रपंचाचें ॥ ४ ॥

१३ त्रिवेणी संगमीं नाना तीर्थें भ्रमी । चित्त नाहीं नामीं तरी तें व्यर्थ ॥ १ ॥ नामासी विन्मुख तो नर पापिया । हरिवीण धांवया न पवे कोणी ॥ २ ॥ पुराणप्रसिद्ध बोलिले वाल्मिक । नामें तिन्ही लोक उद्धरती ॥३॥ ज्ञानदेव म्हणे नाम जपा हरीचें । परंपरा त्याचें कुळ शुद्ध ॥ ४ ॥

१४ हरि उच्चारणीं अनंत पापराशी । जातील लयासी क्षणमात्रें ॥ १ ॥ तृण अग्निमेळें समरस झालें । तैसें नामें केलें जपतां हरि ॥ २ ॥ हरि उच्चारण मंत्र हा अगाध । पळे भूतबाधा भेणें तेथें ॥ ३ ॥ ज्ञानदेव म्हणे हरि माझा समर्थ । न करवे अर्थ उपनिषदां ॥ ४ ॥

१५ तीर्थ व्रत नेम भावेंवीण सिद्धी । वायांचि उपाधी करिसी जना ।। १ ।। भावबळें आकळे येऱ्हवीं नाकळे । करतळीं आंवळें तैसा हरि ।। २ ।। पारियाचा रवा घेतां भूमीवरी । यत्न परोपरी साधन तैसें ।। ३ ।। ज्ञानदेव म्हणे निवृत्ति निर्गुण । दिधलें संपूर्ण माझे हातीं ।। ४ ।।

१६ समाधी हरीची समसुखेंवीण । न साधेल जाण द्वैतबुद्धी ।। १ ।। बुद्धीचें वैभव अन्य नाहीं दुजें । एका केशीराजें सकळ सिद्धी ।। २ ।। ऋद्धि सिद्धि निधी अवघीच उपाधी । जंव त्या परमानंदीं मन नाहीं ।। ३ ।। ज्ञानदेवीं रम्य रमलें समाधान । हरीचें चिंतन सर्वकाळ ।। ४ ।।

१७ नित्य सत्यामित हरिपाठ ज्यासी । कळिकाळ त्यासी न न पाहे दृष्टी ।। १ ।। रामकृष्ण उच्चार अनंत राशी तप । पापाचे कळप पळती पुढें ।। २ ।। हरि हरि हरि हा मंत्र शिवाचा । म्हणती जे वाचा तया मोक्ष ।।३।। ज्ञानदेवा पाठ नारायण नाम । पाविजे उत्तम निजस्थान ।। ४ ।।

१८ एक नाम हरि द्वैत नाम दुरी । अद्वैत कुसरीं विरळा जाणे ।। १ ।। समबुद्धि घेतां समान श्रीहरि । शम दमा वैरी हरि झाला ।। २ ।। सर्वांघटीं राम देहादेहीं एक । सूर्य प्रकाशक सहस्ररश्मीं ।। ३ ।। ज्ञानदेवा चित्तीं हरिपाठ नेमा । मागिलिया जन्मा मुक्त झालों ।। ४ ।।

१९ हरि बुद्धी जपे तो नर दुर्लभ । वाचेसी सुलभ रामकृष्ण ।। १ ।। रामकृष्ण नामीं उन्मनी साधिली । तयासी लाधली सकळ सिद्धि ।। २ ।। सिद्धि बुद्धि धर्म हरिपाठीं आले । प्रपंचीं निवाले साधुसंगें ।।३।। ज्ञानदेवीं नाम रामकृष्ण ठसा । येणें दश-दिशा आत्माराम ।।४।।

२० हरिपाठ कीर्ति मुखें जरी गाय । पवित्रचि होय देह त्याचा ।। १ ।। तपाचे सामर्थ्यें तपिन्नला अमूप । चिरंजीव कल्प

वैकुंठीं नांदे ॥ २ ॥ मातृ पितृ भ्राता सगोत्र अपार । चतुर्भुज नर होऊन ठेले ॥ ३ ॥ ज्ञान गूढ गम्य ज्ञानदेवा लाधलें । निवृत्तीनें दिल माझ्या हातीं ॥४॥

२१ हरिवंश पुराण हरिनाम संकीर्तन । हरिवीण सौजन्य नेणें कांहीं ॥ १ ॥ तया नरा लाधलें वैकुंठ जोडलें । सकळही घडलें तीर्थाटण ॥ २ ॥ मनोमार्गें गेला तो येथें मुकला । हरिपाठीं स्थिरावला तोचि धन्य ॥३॥ ज्ञानदेवा गोडी हरिनामाची जोडी । रामकृष्णीं आवडी सर्वकाळ ॥४॥

२२ वेदशास्त्र प्रमाण श्रुतीचें वचन । एक नारायण सार जप ॥ १ ॥ जप तप कर्म हरिवीण धर्म । वाउगाचि श्रम व्यर्थ जाय ॥ २ ॥ हरिपाठीं गेले ते निवांतचि ठेले । भ्रमर गुंतले सुमनकळिके ॥ ३ ॥ ज्ञानदेवीं मंत्र हरिनामाचें शस्त्र । यमकुळ गोत्र वर्जियेलें ॥४॥

२३ नामसंकीर्तन वैष्णवांची जोडी । पापें अनंत कोडी गेलीं त्यांचीं ॥ १ ॥ अनंत जन्मांचें तप एक नाम । सर्व मार्ग सुगम हरिपाठ ॥ २ ॥ योग याग क्रिया धर्माधर्म माया । गेले ते विलया हरिपाठीं ॥ ३ ॥ ज्ञानदेवीं यज्ञयाग क्रिया धर्म । हरिवीण नेम नाहीं दुजा ॥४॥

२४ काळ वेळ नाम उच्चारितां नाहीं । दोन्ही पक्ष पाहीं उद्धरती ॥ १ ॥ रामकृष्ण नाम सर्व दोषां हरण । जड जीवां तारण हरि एक ॥ २ ॥ नाम हरि सार जिव्हा या नामाची । उपमा त्या दैवाची कोण वानी ॥ ३ ॥ ज्ञानदेवा सांग झाला हरिपाठ । पूर्वजां वैकुंठ मार्ग सोपा ॥४॥

२५ नित्य नेम नामीं तो नर दुर्लभ । लक्ष्मीवल्लभ तयाजवळी ॥१॥ नारायण हरि नारायण हरि । भुक्ति मुक्ति चारी घरीं त्यांच्या ॥ २ ॥ हरिवीण जन्म तो नरकचि पैं जाणा । यमाचा पाहुणा प्राणी होय ॥ ३ ॥ ज्ञानदेव पुसे निवृत्तीसी चाड । गगनाहुनी वाड नाम आहे ॥४ ॥

२६ सात पाच तीन दशकांचा मेळा । एकतत्त्वीं कळा दावी हरि ॥ १ ॥ तैसें नव्हे नाम सर्वत्र वरिष्ठ । येथें कांहीं कष्ट न लगती ॥ २ ॥ अजपा जपणें उलट प्राणाचा । तेथेंहि मनाचा निर्धारु असे ॥ ३ ॥ ज्ञानदेवा जिणें नामेंवीण व्यर्थ । रामकृष्णीं पंथ क्रमीयेला ॥४॥

२७ जप तप कर्म क्रिया नेम धर्म । सर्वांघटीं राम भावशुद्ध ॥ १ ॥ न सोडी रे भावो टाकीं रे संदेहो । रामकृष्णीं टाहो नित्य फोडी ॥ २ ॥ जात वित्त गोत कुळ शीळ मात । भजे कां त्वरित भावनायुक्त ॥३॥ ज्ञानदेवा ध्यानीं रामकृष्ण मनीं । वैकुंठभुवनीं घर केलें ॥४॥

२८ जाणीव नेणीव भगवंतीं नाहीं । उच्चारणीं पाही मोक्ष सदा ॥ १ ॥ नारायण हरि उच्चार नामाचा । तेथें कळिकाळाचा रीघ नाहीं ॥ २ ॥ तेथील प्रमाण नेणवे वेदांसी । ते जीव जंतूंसी केवीं कळे ॥ ३ ॥ ज्ञानदेवा फळ नारायण पाठ । सर्वत्र वैकुंठ केलें असे ॥४॥

२९ एकतत्त्व नाम दृढ धरीं मना । हरीसी करुणा येईल तुझी ॥ १ ॥ तें नाम सोपारें रामकृष्ण गोविंद । वाचेशी सद्गद जपे आधीं ॥२॥ नामापरतें तत्त्व नाहीं रे अन्यथा । वायां आणिक पंथा जाशी झणी ॥ ३ ॥ ज्ञानदेवा मौन जपमाळ अंतरीं । धरोनी श्रीहरी जपे सदा ॥४॥

३० सर्व सुख गोडी सर्व शास्त्र निवडी । रिकामा अर्धघडी राहूं नको ॥ १ ॥ लटिका व्यवहार सर्व हा संसार । वायां येरझार हरिवीण ॥ २ ॥ नाम मंत्र जप कोटी जाईल पाप । कृष्णनामीं संकल्प धरुनी राहे ॥ ३ ॥ निजवृत्ति काढीं सर्व माया तोडीं । इंद्रिया सवडी लपों नको ॥४॥ तीर्थव्रतीं भाव धरीं रे करुणा । शांती दया पाहुणा हरि करीं ॥ ५ ॥ ज्ञानदेवा प्रमाण निवृत्ति-देवी ज्ञान । समाधि संजीवन हरिपाठ ॥६॥

## बाळक्रीडा.

३१ गोकुळीं कमळ विस्तारलें साचें । ध्यान श्रीधराचें करावया । यमुनेच्या पाबळीं मूर्ति देखिली सांवळी । चिदाकाशींची वोतली । प्रेमतनु गे माय ॥१॥ आवडीचें वालभ ब्रह्म पुंजाळलें । गोपवेषें गाई राखे । कांबळीची बुंथी घेऊनि कल्पद्रुमातळीं । त्रिभंगी ठाण मांडियलें गे माय ॥ध्रु०॥ योगमायेचेनी विलासे उभा देहुडा पाउलीं । तेथें दीप्ति जे उदेली तेजाकारें ॥ अंगुष्ठीं अंगुष्ठ स्थापिलें मूळपीठ । सुनीळनभाचेनि काळीवटे । अंगोळिया गे माय ॥२॥ शेष गुढारी विसंचला कीं भूमि पांवो ठेविला । तोचि विन्यस्त उभारला तेजः-पुंज ॥ कुंकर्मापिजरिचेनि सळे मा पर्वतीं रातोत्पळें । तळवाचे रंग बाहुळे । पाऊळीं श्लाघे गे माये ॥३॥ चरणकमळीं कमळा कैसी विराजली बाळा । तेथें जाला एकवळा कमळीं कमळा ॥ ध्वजवज्र अंकुश रेखा । चरणीं वोळलीं पीयुषा । नखें सरळीं देखा । काळे-पणाचेनि गे माये ॥४॥ घोटी सुनीळ निरावकाशें । काश पाहातां भासलासे । जानुजघन प्रकाशें नभ धवळलें ॥ कासे कसिला सोन-सळा । खेवे आला मध्यस्थळा । रत्नजडित मेखळा । शोभतसे गे माये॥५॥ द्वितीय कमळीं प्रजापती । कीं रोमराजी झळकती । तेथें उप-नली दीप्ति । काळीं त्रिवळीची ॥ उदरवक्षस्थळ । द्विजपद निर्मळ । स्तनचंद्र पोकळी ढिसाळ । काळिमा जैसी गे माये ॥६॥ उदधीचेनी प्रेमसळें । आपाद वैजयंती माळे । वरी शोभताती सोहळे सगुणाचे ॥ दशनदीप्ति झळाली । रत्नकिळा मागों आली । दिसे हनुवटी बुजाली । प्रभेचेनिगे माय ॥७॥ प्रणवाचा मरिगळा । पूजनासी आला भाळा । तुर्येसहित त्रिपुंड्र टिळा । अध ऊर्ध्व मात्रीं ॥ अभिनव महाकारणीं । पवनपंचकाचीं खेवणीं । कुंडलें पेरावाणी । कर्णीं ढाळ देती गे माये ॥८॥ माथां मोर पिसावेठीं । गंडस्थळीं पडे दीप्ति । स्वयें विस्मित श्रीपती । तेजःपुंज गे माये ॥ तरुघोंस खोंविले शिरीं । वेणु ठेऊनि अधरीं । नंदरायाचा खिल्लारी । वोज काय सांगों गे माये ॥९॥ सप्तरंध्रीं सप्तस्वर । चाळी अंगोळिया मनोहर । मुद्रिका शोभती साकार । रत्नजडित गे माये ॥ तिया वेणूचिया किळा ।

गोपी वेधल्या सकळा । अवघिया जाल्या पैं काळ्या । कृष्णरूपें गे माय ॥१०॥ ऐसा नटनाटच वेषधारी । सहिजू संवगडे वारिधारी । कैसा त्रिभंग कुसरी । उभा असे गे माये ॥ बापरखुमादेविवरु विठ्ठलु सुखाचें निधान । तें म्यां हृदयीं संपूर्ण सांठविलें गे माये ॥ ११ ॥

३२ भक्तीचिया चाडा । गोकुळासी आला । त्याशी गौळणी म्हणती वाल्हा । दुल्हा गे माये॥आवडीच्या सुरवाडें। परब्रह्म सुरवाडे । त्यासी गौळणी खेळविती लाडें । कोडें गे माये ॥ १ ॥ गोजिरिया कान्हो अपछंद मत्ता । पाउलीं रंगे रंगनाथा । दृष्टीचिया डोळां सुख निवडेना मागुतें । ते वाचा वर्णवी केवीं आतां रया ॥ ध्रु० ॥ अठुले लोळिया ढाळ देती । कानीं मुक्तें खेवणी हरिखें वर्णिली । अंतरिंचिया सुखा । प्रगट दाविती देखा । ललाटीं झळकती रेखा । रत्नजडित पत्रें माथां गे माये ॥२॥ योगबंदु दिधला । तैसा दोंदिलु मिरवला । नाभिकमळीं प्रकाश जाला । परमेष्टी ॥ कटितटीं कडदोरा । साजे त्या सुंदरा । लोण उतरती पुरां । वेधु मानसीं वसे गे माये ॥३॥ श्रुतिचेनि समागमें । पाउलें गोजिरीं । घागुरलों प्रेम नेपुरें । कैसी वो पदेंती । अंदु वाकी नेवाळे । पाय करिती बिंबिलें । मुनिजनांचे सुखसोहाळे । पुरवितसे गे माय ॥४॥ ऐसा आपुलिये लीळे ।आपणासींच खेळे । गौळणी भरूनियां डोळे । कैशा पाहताती ॥ अवघें कृष्णरूप भरलेंसें मानसीं । बापरखुमादेविवरेंसी । मिळोनि गेल्या गे माये ॥५॥

३३ जटिल धुळधुसिर । दोंदिल डोळसु । अंगणीं बाळचंद्र खेळतां दिसे ॥ तें देखोनियां यशोदा । माया पसरोनियां बाह्या । तें क्षेम सांगावया । वाचा कैची? ॥१॥ बालभतें ब्रह्म गोकुळीं आनंदें । गौळियाच्या छंदें खेळतां दिसे ॥ध्रु०॥ थुरथुर चालत । भूमी पाय ठेवीत । आंसु बाहिर दावित । यशोदे माय ॥ तो नित्य पूर्ण म्हणे कड घे कां वो माय । स्तनपान दे कासये वोसंगा गे माये ॥ २ ॥ दोनी चारी कणिका । वक्त्रारविंदीं देखा । तें मुखमयंका माहेर होता ॥ तें उचलोनि कपोळीं । स्नेहें चुंबिती गौळणी । मांजयाची

सिरयाणी। ध्यानीं मुनिजनां गे माय ॥ ३ ॥ विश्व प्रतिंबिबाचें बिंब। तो कान्हया वो साजणी। त्यासी वोसंगा घेऊनी। गौळणी स्तनपान देती ॥ सर्वेंचि कासाविस होती पाही। मा साचची कान्हया नाहीं। तेथें यशोदा ते कैंची ॥४॥ वेदशास्त्रापुराणा। आणि यज्ञत। दाना। श्रुति धांडोळितां मना। ठावो नुरेची ॥ मां मां म्हणोनि। गौळणी अंगोळिया धरिती। मां विस्मयो करिती चोज अचोज गे माये ॥५॥ ब्रह्मादिकां लक्षां नये। कल्प गेले युगे युगे। तो गौळणिया वोसंगा निघाला गे माये ॥ तें बाळ भावाचें। कीं संत देवाचें। न वर्णवे वाचे। दिपोदिपीं वो माय ॥६॥ सांवळा सुजेडु। कीं सुधेपरीस गोडु। तो या डोळ्यां उजियेडु। डोळसु तो ॥ त्यानें एकें घेइजे। देइजे एके पुजिजे। मां प्रीतिचेनि माजे। नेणिजे दुजे गे माये ॥७॥ हारवी कांई आपुलेपण न सांडितां। गांवोगांवीचा होतु जातु। तैसा गोकुळीं गोपिनाथु। सकळ जनां गे माय ॥ कृष्ण परब्रह्म पुतळा। कीं आनंदाची कळा। तो हा भोगितां हे लीळा। मदनाची गे माय ॥८॥ एक पावलों म्हणती। तें कांहींच नेणती। अनुसरलिया हातांतळीं। पावा पावा म्हणे निवृत्तिदासु हरि। बापरखुमादेविवरु विठ्ठलु। करील तें निकें गे माय ॥९॥

३४ योगियां मुनीजनां ध्यानीं। तें सुख आसनीं नयनीं ॥१॥ हरिसुख फावलें रे ॥ध्रु०॥ गोकुळींच्या गौळिया। गोपी गोधना सकळां ॥२॥ बापरखुमादेविवर विठ्ठलें। तें सुख संवगडिया दिधलें ॥३॥

३५ पावया लुब्ध झाल्या पावळा। गाई परे वळा रे कान्हो ॥१॥ विसरल्या चार विसरल्या पार। तल्लीन साचार कृष्णमूर्ति ॥ध्रु०॥ पाणिया निघाल्या गाई चरती कळंबा ठायीं। हांकितसे लवलाही सवंगडा ॥२॥ ज्ञानदेवीं गाई हाकितु पावे सोई। हरिनाम दोही सत्राविये ॥३॥

३६ गायी चालिल्या वनाप्रती। सवें पेंधा चाले सांगाती ॥१॥ वळि गोवळिया कान्होबा। यमुने पाण्या नेई तूं बा ॥ध्रु०॥ पांवया छंदें परतल्या गाई विसरल्या चारा तल्लीन ठायीं ॥ २ ॥ ज्ञानदेव सवें सवंगडा लाठा। गाई। हांकितो गोठणा तटा ॥ ३ ॥

३७ माथे टेंकित बाहुचा पसरित। डांगाचे आधार घेती ॥ध्रु०॥ एक म्हणती आम्हीं उचलिला पर्वत । बहुत मिळोनी काय नव्हती रे ॥ १ ॥ बाहे कडाडित मनगटें लचकत । म्हणोनी उठिले अवघे रे ॥ २ ॥ तयामाजीं असतां न दिसे बाप । समर्थ थोर तुझी माव रे ॥ ३ ॥ काळु आतुडे परी वेळु नातुडे । म्हणोनी रक्षिलें सकळां रे ॥ ४ ॥ बापरखुमादेविवरु विठ्ठल साचा । म्हणोनी रक्षिलें आह्मां रे ॥५॥

३८ कल्पद्रुमातळीं ब्रह्म पुंजाळलें कैसें । दिसतें सुनीळ तेज गे । मज पाहतां वेणु वेदध्वनि नाद । उमटताती सहजगे बाई ये ॥१॥ आनंदें गोपाळ गोधनें राखे । सीतळ यमुनेच्या पाबळीं । कर्मकाठीं करीं घेऊनियां वळी त्या देतुसे पांचाच्या मेळीं गे बाई ये ॥ ध्रु० ॥ ऐसा जिकडे तिकडे उभा राहोनी बाहो । हणितो थोरेनि तयांचिया कर्मा हो कोपतसे निर्वृत्ति । काय पुरवील येवढें तप गे बाई ये ॥ २ ॥ गोवळेपणाचेनि वेषें । अमरीं सेविजे ऐसें बोलताती सवंगडे । येरुनी येराचिया उच्छिष्टा झोंबती । नेणों तया काय जोडे गे ये बाई ये ॥३॥ मुनिजनां स्तवितां संतोष न पवे । तो हुमली घेतां हांसे । ब्रह्मादिकां बोलाचीं अक्षरें । कोण जाणे प्रेम कैसें गे बाई ये ॥४॥ ऐसा साही दर्शनां वर्णितां पवाडु नाहीं । आणि गोवळे-पणें वेष नवल सांगों मी कायी । बापरखुमादेविवर विठ्ठलु सेविलिया । वांचूनि नेणवे केलिया कांहीं गे बाई ये ॥५॥

३९ नागोठणीं गोपाळ । वळतिया देतो । कीं आनंदली गोधनें । ऐकोनी वेणुध्वनी तत्त्वतां । तुझी सांवळी सुंदर बुंथी । न विसंबे क्षणभरी । तेवीं सुखीं सुख पाहतां । निर्जाचित्तारया ॥१॥ आनंदल्या मनें । पहा तूं निधान । जवाळल्या निजधन । सांडूं नको ॥ ध्रु० ॥ म्हणोनि कल्पनेचा । उभारा मन संधीचा । संधु भागु अनुसराया । गोठणींचया । दुर्लभ शक्ति ते । गोपवेषें नटलें चैतन्य । मांदुसेचें परांदिकां । नव्हे निजशक्ति रया ॥२॥ म्हणोनी रखुमादेविवरु । सदसुखाची नीजवोल । पाहें मीतंपणा नातळे । तो ऐसीयाचि

बुंथी सखोल । निवृत्तिरायें खुणा। दाऊनि सकळ । निज चैतन्य पाहे निखळ रया ।।३।।

४० हरिप्रेम सरोवरी । क्रीडती ये मदनकुहरीं । प्रेम सरोवरीं ये ॥ १ ॥ चांदिणें निर्मळ । चंदनें धवळतिये । पैल वृंदावनीं वासुगा गोविंदु खेळतिये ॥ ध्रु० ॥ प्रकृति भक्ति परमातु । मातु मा परमहंसु । ज्ञानदेवो म्हणे निवृत्तिदासु ।।२।।

४१ गोंवळेपणाची बुंथी घेऊनियां भेष । रिझविशी मानस यशोदेचें ।।१।। त्या सुखें ब्रह्मांड थोडें पां तियेसी । दुग्ध पै मागशी बाळपणें ।।२।। ऐसें मोहियेलें जगभक्त अंतरंग । भावाचे सुरंग प्रेमबोधें ॥ ३ ॥ मज मानसीं सुख तुझ्या रूपीं बोलावा । सर्वेंद्रियें दोहावा तुझ्या नामीं ।।४।। जन हे विव्हळ तुजवीण अविचार । गुंफले साचार मायामोहें ।।५।। आतां ऐसें करीं तुज मज सरोभरी। प्रपंच केसरी होई रया ।।६।। बापरखुमादेविवरु सोपारा पै निळा । निवृत्तीनें कळा सांगितली ।।७।।

४२ लक्ष लावुनी अंतरीं । कृष्णा पाहती नरनारी । लावण्य-सागरु हरि । परमानंदु ।।१।। छंदें छंदें वेणु वाजे । त्रिभुवनीं धनु गाजे । उतावेळ मन माझें । भेटावया ।।२।। ब्रह्मविद्येचा पुतळा । गाई राखतो गोवळा । श्रुति नेणवे ते लीळा । वेदां सनकादिकां ।।३।। भूतग्रामींचा परेशु । तापत्रयाचा करीं नाशु। आड धरुनी गोपवेषु । वत्सें राखे ॥ ४ ॥ रासक्रीडा वृंदावनीं खेळे । इंदुवदन मेळे । उद्धरी यदुकुळें । कुळदीपकें ॥ ५ ॥ निवृत्तिदासाचा दातारु । बापरखुमादेविवरु। भक्तां देतो अभयकरु। क्षणक्षणांमाजीं ।।६।।

४३ गुणें सकुमार सावळे । दोंदील पहाती पां निराळें । केवीं वोळळें गे माय । सुख चैतन्याची बुंथी ओतली । ब्रह्मां-दिकां न कळे ज्याची थोरवी । तो हा गोवळीयाच्या छंदें क्रीडतु । साजणी नवल विंदान न कळे माव रया ॥ १ ॥

डोळां बैसलें हृदयीं स्थिरावलें । मन नुठी तेथून कांहीं केल्या ॥ ध्रु० ॥ सच्चिदानंद पदीं । पदातें निर्भेदी । निजसुखाचे आनंदीं । माये क्रीडतुसे ॥ जो हा डोळियांभीतरीं । बाहिजु अभ्यंतरीं । जोडे हा उपावो किजो रया ॥ २ ॥ गुणांचे पैं निर्गुण । गंभीर सद्‌सुखाचे उद्‌गार । जें प्रकाशक थोर । सकळ योगाचे ॥ आनंदोनी पाहें पां साचे । मनीं मनचि मुरोनी राहे तैसें । बापरखुमादेविवरा विठ्ठलें । कीं मुसेमाजीं अळंकार मुराले । श्रीगुरुनिवृत्तीनें दाविलें सुख रया ॥३॥

४४ परब्रह्म सांवळें । गोपवेशें निराळें । हृदयकमळीं स्थिरावलें । काय सांगों ॥ कायावाचामनें । पाहें जों पाहणें। तंव नवलाव होय । निर्गुण रया ॥१॥ नामरूपीं गोडी। हेचि आवडी आतां । न विसंबे सर्वथा । तुजलागीं ॥ ध्रु० ॥ जगड्‌व्याळ प्रपंचभान । हें तुज नातुडे हन । वायां भोगिसी जाण। का रे याचें ॥ तुझीची बुंथी तुज । न कळे याचें चोज । । केवीं वर्णिसी सहज । गुणें रया ॥ २ ॥ म्हणोनि दृष्टि । चोरुनि पडे मिठी । मन चोरूनियां पुढतापुढती । तुजचिमाजीं ॥ बापरखुमादेविवरा । विठ्ठला उदारा । येणेंचि नाहीं त्रिशुद्धि । येणें निवृत्तिरायें खुणा । दाऊनियां सकळगुणीं गुणातीत । तुटली आधी रया ॥३॥

४५ मदनमूर्ति तूं डोळयां । आसुमाय जालासी । सेखीं कामिनीचेनि पक्षें । तीं पुराणें पिशाच करिती रया ॥ १ ॥ गोजिरिया गुणनिधाना । बापा गुंतल्यापणाचिया साठीं ॥ वेद-विदेही विचारितां तेथें । आगम काढिती आटी रया ॥ ध्रु० ॥ सायुज्यता जालिया । मग सादृश्यपण तेथें लोपे । अवयव अळं-कार मुरालिया । तेथें दृष्टि परमार्थ थोपे रया ॥ २ ॥ तत्त्व-पणाचेनि समरसें। तेथें पुरोनी उरे तें शेष। बाप रखुमादेविवरु विठ्ठलीं । गगनीं नक्षत्र पडे नुरेचि तेथ रेख रया ॥ ३ ॥

४६ सांगाती आमुचिया रे । विद्‌गत पांवया छंदे रे ॥१॥ नाचे विनोदें कान्हा रे । विद्‌गद पांवया छंदें रे ॥२॥ निवृत्तिदासा प्रियो रे । विद्‌गद पांवया छंदें रे ॥३॥

४७ वृंदावनीं आनंदु रे । विठ्ठल देवो आळविती रे ।। १ ।। गोपाळ रचले रे । विठ्ठलदेवो आळविती रे ।। २ ।। निवृत्तिदासा प्रियो रे । विठ्ठल देवो आळविती रे ।।३।।

४८ काळिये रात्रींचा चंद्रमा । कीं सांवळी बुंथी आम्हां । काळिये वेळीं ते सीमा । नवलावो ।। सुनीळ काळिये भरु । मेघ: शाम सांवरु । तोचि नवलावो । हा धीरु रया ।। १ ।। आतां काळिये दिनु मज । न स्मरे वो कांहीं । तुझें तुज पाहीं । गाऱ्हाणें रया ।।ध्रु।। म्हणोनी यमुना । कालिंदीजळ सांवळें । योगिया शून्यातीत । तटीं मिळे । सुखिया सुखाचेनी । कल्लोळें देखतसे दिठी । सांवळा भरु खुंतलासे मज । नाठवे द्वैत काज रया ।।२।। येणें सुख चैतन्य । डोळयां हो कां मिळणी । कीं नेत्रीं नेत्र उन्मळणीं । तटस्थपणें ।। हा सर्वांग अंग प्रत्यांग होऊनियां जेथ । विचारती मुनिजनांचीं मनें । तो हा रखुमादेविवरु । पाहतां दिठीं आतां । पुनरपी नाहीं येणें रया ।।३।।

४९ भोंवरीं सांडूनि पांव ठेवी रे गोपाळा । नाच चिदानंदा सुख होईल सकळां ।।१।। रंगु रंगला रे रंगु रंगुला रे । आदि मध्य अंत त्रिगुणविरहित विश्वीं प्रकाशला रे ।।२।। रंगु रंगला सुरंग जाला । पहिलिये रंगीं निवृत्ति भला ।।३।। सुखीं सुख मुरे प्रेमें चिदानंद उरे । बाप रखुमादेविवरु विठ्ठलु रे ।।४।।

५० तुझिये निढळीं कोटि चंद्र प्रकाशे । कमलनयन हास्यवदन हांसे ।। १ ।। कृष्णा हालका रे कृष्णा डोलका रे । घडिये घडिये घडिये गुजबोलका रे ।।२।। उभा राहोनियां कैसा हालवितो बाहो । बाप रखुमादेविवरु विठ्ठलु नाहो ।।३।।

५१ कोंवळे ठुसठुसित मोतियांचे घड । शृंगारिलें गूढ जया लेणीं ।।१।। बैसोनियां रथीं सुरनर खेळती । देखोनिया पशुपती वेडावला ।। २ ।। युक्ति खुंटली वासना निमाली । कळा पैं बैसली पद्मासनीं ।।३।। होय कीं नव्हे ज्ञानदेव पुसती । आठवितां निवृत्ति भेटी होये ।। ४ ।।

५२ पांवया छंदें तल्लीन गोविंदें । नाचती आनंदें गोपाळ कैसे ॥१॥ यमुनेच्या तीरीं गाई चारी हरि । गोपाळ गजरीं आनंदले॥२॥ ठायीं ठायीं मातु पेंधा पैं नाचतु । वाकुल्या दावितु हरिछंदें ॥३॥ ठायीं ठायीं उभ्या विसरल्या माया । हाकितु लवलाह्या कृष्णहरि ॥४॥ ज्ञानदेवा जीवीं कृष्ण चिरंजीवी । गोपाळ रंजवी प्रेमभक्ति ॥ ५ ॥

## गौळणी

५३ माझ्या कान्होचें तुम्ही नांव भरी घ्यावो ॥ हृदयीं धरुनी तुम्ही खेळावया न्यावो ॥१॥ भक्ताकारणे येणें घेतलिसे आळी । दहा गर्भवास सोसिले वनमाळी ॥ २ ॥ कल्पनेविरहित भलतया मागें अभिमान सांडूनि दीनापाठीं लागे ॥३॥ शोखिली पूतना येणें मोहियें लेकरूं ॥ आळी संडी बापरखुमादेवीवरु ॥४॥

५४ एकुचि एकला जाला पैं दुसरा । एकमेकी सुंदरा खेळविती ॥१॥ माझिये कडिये तान्हा । तुझिये कडिये तान्हा । देवकी यशोदा विस्मो करिती मनीं ॥२॥ बापरखुमादेवीवरु आवडे मना । जगत्रजिवनु कान्हा बाईयानों ॥३॥

५५ मे दूरथि कर जोडूं ॥ ता-हो सेवा न जाणूं ॥ १ ॥ मन्हा रे कान्हा मन्हा रे कान्हा ॥ देखि कां न नेणारे मन्हा कान्हारे ॥ २ ॥ ता-हा मराठा देश ॥ मन्ही बागलाणी भाष ॥ ३ ॥ धटिपटि विजार ॥ खंडे भाले तरवार ॥४॥ बापरखुमादेवीवरु जाण । ऐसें मन्हा कान्हा ॥५॥

५६ त्वचेचियां राना धाडूं नको मना ॥ तेथें नंदाचा कान्हा डोळा घालि गो आयि यो ॥१॥ गाईचा गोवळा यमुनेचा पाबळा ॥ धरि माझा अचुळा मग मी पळालियो गो ॥२॥ ताकपिरि गोवळी केली मजसि रांडोळी ॥ भावें नारली मग मी पळालिये गो ॥४॥ गळां गुंजमाळा गाठी । डांगा मोरविसा वेठी ॥ सोकरू लागे पाठी । नंदरायाचा गो आई यो ॥४॥ एक्या करें धीर । बीजा करें वेढारो ॥

चुंबन दे हरि। मग मी पळालिये गो ॥५॥ ऐसि पळत पळत गेलिये॥ कान्होनें मोहिलिये ॥ माझी मीचि जालिये । मग मी समोखिलिये गो ॥६॥ तुना चारा लागते गोर। तुना बोर लागतो गोर ॥ तुना बाही माजी चार। माझी आईयो गो गो ॥ ७ ॥ पूर्वपुण्य फळलें देहमुक्त जालें ॥ बापरखुमादेवीवरा विठ्ठलें। ऐसें केलें गो आई। यो ॥ ८ ॥

५७ ठाकूनि आलिये तुजपासी ॥ थिते मुकलिये मनुष्यपणासि ॥ १ ॥ भलें केलें विठ्ठला पिकें भरला साउला ॥ घरीचो कोपती सोडीं जाऊं दे वहिला ॥२॥ संसार साउला माझा पालटुनि देसी ॥ तरी मी होईन तुझी कामारी दासी ॥३॥ संसार साउला पालटुनि देसी ॥ बापरखुमादेवीवरा विठ्ठला गुणरासी ॥४॥

५८ दुडीवरी दुडी गौळणी साते निघाली। गौळणी गोरसु म्हणों विसरली ॥ १ ॥ गोविंद घ्यावो दामोदर घ्यावो ॥ तंव तंव बोलती मथुरेच्या वो ॥ २ ॥ गोविंद गोरसु एकचि नांवा ॥ गोरसु विकूं आले तुमच्या गांवा ॥४॥ बापरखुमादेवीवर विठ्ठलेसी भेटी ॥ आपुलें संवसाटि करूनि ठेली ॥

५९ बा वनाचे संगती द्रुमभावें रातलें ॥ शेखी आपुलिया मुकले जातीकुळा ॥ १ ॥ लोहाचें सायास परिसासी फीटले ॥ तैसे मज केले गोवळ्यानें ॥२॥ मेघजळ वोळे मिळे सिंधूचिया जळा ॥ तैसा नव्हे तो वेगळा एक होऊनि ठेला ॥३॥ बापरखुमादेवीवरी विठ्ठली नुरेची कांहीं ॥ उत्तम मध्यम ठाई व्यापूनि असे ॥४॥

६० सांवळीये निळी भुलली एकी नारी ॥ परेचा वो घरी शुद्धि पुसे ॥ १ ॥ सांग गे बाईये कवणे घरीं नांदे। कैसे वो गोविंदे हिंडविलें ॥ २ ॥ चहूं मार्गी गेले न संपडे वाट ॥ मग चैतन्याचा घाट वेधलीये ॥ ३ ॥ ज्ञानदेवीं सधिधि स्थान पैं विठ्ठल ॥ अवघा चित्ती सळ हरपला ॥ ४ ॥

६१ काय सांगू तूतें बाई ॥ काय सांगू तूतें ॥ध्रु०॥ जात होते यमुने पानिया वातत भेतला समाला ॥ दोईवल टोपी मयुल पुछाची

खांद्यावली कांबला ॥१॥ तेनें माझी केली तवाली । मग मी तेथून पलाली ॥ पलतां पलतां घसलून पलली । दोईची घागल फुतली ॥ २ ॥ माझे घुलगे फुतले ॥ मग मी ललत बथले ॥ तिकून आले शालंगपानी । मला पोतासी धलिलें ॥ ३ ॥ मला पोतासी धलिलें । माझें समादान केलें ॥ निवृत्तीचें कृपें सुख हें ज्ञानदेवा लाधलें ॥४॥

६२ सोनियाचा दिवस आजि अमृतें पाहाला ॥ नाम आठवितां रूपीं प्रगट पैं झाला ॥१॥ गोपाळा तुझें ध्यान लागो मना । आनु न विसंबे हरी जगत्रजीवना ॥ २ ॥ तनुमनु शरण विनटलो तुझ्या पायीं ॥ बापरखुमादेवीवरावांचुनी आणिक नेणें कांहीं ॥ ३ ॥

६३ त्रिभंगी देहुडे ठाण मांडुनियां माये ॥ कल्पद्रूमातळी वेणू वाजवित आहे ॥१॥ गोविंदु वो माये गोपाळु वो ॥ सबाह्य अभ्यंतरी अवघा परमानंदू वो ॥ २ ॥ सावळे सगुण सकळा जीवांचें जीवन ॥ घनानंद मूर्ति पाहतां हरपलें मन ॥ ३ ॥ शून्यस्थावरजंगम व्यापूनि राहीला अकळ ॥ बापरखुमादेवीवरु विठ्ठलु सकळ ॥ ४ ॥

६४ सुखाचा निधि सुखसागर जोडला । म्हणो निळा दावुला मज पाचारी गे माय ॥ १ ॥ प्रेम नव्हाळी मज झाली दिवाळी ॥ काळे वनमाळी आले घरा गे माय ॥२॥ बापरखुमादेवीवर पुरोनी उरला ॥ सबाह्यजु भरला माझें हृदयीं गे माये ॥३॥

६५ द्वैताद्वैत विरहित गौळणी । अमृत दुडियां भरोनियां सांजवणी गे माये ॥ अभिनव करूनियां शृंगारू माथा गोरसाचा भारू । आजि निघाल्या विकरा करूं मथुरे हाटा । प्रेम उचंबळले चित्ती हासे चाले हंसगती । पुढें सखिया खेळती जीवीं जिवलगा ॥ दृष्टी फिटला संदेहो लागे कांबळीचा सोवो । तंव माझारी कृष्णदेवो स्वरूपी दिसे ॥ १ ॥ नवलाव गे नवलाव देखियेला ॥ ध्रु० ॥ दृष्टीं देखिला लोचनी लाजलिये विरोनि । मागती खुंटलीसे मनीं पांगुळले । सरलें नेत्रांचे देखणें श्रुतिश्रवण ऐकणें । चित्त चोरियेलें कान्होनें चैतन्यी वो । निमिख खुणावले मज हें तंव घडलें सहज । बिंबीं बिंबतसे निज हें जीव हाचि जाला । आतां नाहीं मज उरि

हा तंव बाहूजू भीतरीं अवघीं अंतरली दुरी गेले मनुष्यपण ॥ २ ॥ याचिये वो भेटी पडिली संसारासी तुटी । शब्द मावळला गोष्टी ते मी काय सांगो । ऐसा कैसा हा दानी करूं नेदितां बोहणी । सुखासाठीं सांजवणी केले रूपातीत ॥ आजि करूनि निर्विकारा रिघु न पुरे जावया घरां । नुरे कल्पनेसी थारा सरलें लिंगदेह ॥ मी तंव वेधलिये त्यासी सर्वोच जालिये तत्वमसि । गुज लपवावे मानसी तुम्ही सखियानों ॥ ३ ॥ याचिया लागल्या अभ्यासें गेलें मीपणाचें पिसे । केले आपलिया ऐसे या इंद्रियासहित ॥ पूर्ण चैतन्य भोगिले हें तंव दुजे निमाले । देही अखंडीत ठेले होते जैसे ॥ आलिंगुनिया अंतरी रिगु न पुरे बाहेरी । निर्विकाराच्या शेजारीं प्रेम दुणावत । बापरखुमादेवीवर विठ्ठलेसी भेटी । आजि संसारा संसाटी घेऊनि गेला ॥ ४ ॥

६६ लेकुरें नसतील काय घरोघरी काय न विये ते माया। परि हे दशा वेगळी नवाई हो । हा न ये त्या आधी जीव निघो पाहे । आला तरी उरो नेदी कांहीं जाय तरी जाये डोळे तळमळिता ठाये। लांचावला जीवूं राहे गे बाई ये ॥ १ ॥ तमाळनिळें चांदणे वो वारी वोवराल आपुलीयेस बये । हें मूळदृष्टी पुढें रिघोनिया झाडा घेत आहे । येणें कान्हये कासाविस केलें गे माय ॥ २ ॥ नेणों कैसे बाळसें डौरले डोळा डोळसे । माजी महुरजता हे हासे भोळि-वेच देखिलियाची पुरे ॥ घालुनी दृष्टीचें भुररे। मग तें हृदयीं वावरे। इच्छावसे गे माये ॥ ३ ॥ थुरथुर करितु शक्ति भोळी वाचालतु । मुद्गलें गुणे बोलतु गे माये । असावतु सावळिया प्रभा डोळसु नभाचा गाभा । कटी कर ठेवूनिया उभा हेंचि जाण गे बाईये ॥४॥ पाहो याची नवलपरी बरवेपणाची हाउली वरी । दृष्टीकर झोंबवी यासी कवण वारी ॥ आम्हीच साहातो अळी परी हे चुंबडी भली । रिघोनिया आड घाली । अंगकांती गे माये ॥ ५ ॥ पहा वो याचा खेळु आमचें नासे कोपो तरी खदखदां हासे । जी जी बाळा म्हणो तरी रुसे वो ॥ राहों नेदी सुखें एक न राहे निमिष एके । वारा कां गोडी सेविखे कान्हो दिठीचे माये ॥ ६ ॥ आतां येइल म्हणोनी

सापडवू द्वारें । आडवू तंव झळाळीत दिसतां हे उजियेडे ।। भित-
रोच्या भितरी लांबा धुमाळू चाचरू। मांडो कामा पाडी आवारू गे
माये ।।७।। गाऱ्हाण्याचेनीं मिसें गौळणी उचंबळता हे ब्रह्मरसे ।
वानवसे चोपसे कृष्णाचेनी ।। मालाथून एक मोहरें देवपण धाडिलें
अनुरे । भावों कीं देवो बैसवाल धुरें पुसे निवृत्तिदासु ।।८।।

६७ कान्हया गोवळू वारिले न करी । दसवंती सांगे नंदा
अवधारी ।। चौघी माया शृंगार करिती । तेथें विघ्नेश्वरू जाले
मुरारी ।। १ ।। आनंदें दोंदिलु नाचे गदारोळे पायी घागुरली
नेवाळे ।। चर्मचक्षू पडले वेगळे । काढुनिया ज्ञानचक्षू दिधले
डोळे गे बाई गे ।। २ ।। गौळणी दहाबारा मिळोनी सोळांची
टोळी । एकी म्हणते याते उभाची कवळू मा काय करील ते
गौळणी गे बाई गे ।। ३ ।। आणिकी एकी साचा बोले त्या
उपरी असे त्या नागिणी । काय सांगो तिचेवीण बहुसाल ते
राहिलीसे भानुते धरूनी ।। ४ ।। तंव मुक्ता दोन्ही आलीसे
धावोनी म्हणती कृष्णा तूं निघ एथूनी ।। तीन नानावी तुम्हां
पाठीच लागतील आंठावे राहे धरूनी ।। ५ ।। गौळणी म्हणती
बाळा कान्हया वेल्हाळा । सांडी या मना चाळा रे । ऐसें ऐकोन
बापरखुमादेवीवरे विठ्ठलें पवनु गिळितया वेळा रे ।। ६ ।।

६८ रांगतु रंगणी चोरितु लोणी धावोनी धरिती गौळणी ।।
बांधिती चरणी देती गाऱ्हाणी यशोदे साजणी । दधी घृत भक्षून
तमालनीळे नवल केलें साजणी ।। १ ।। कृष्ण आळिवा आळिवा ।
परतोनि माते दावा ।। धृ० ।। कृष्णा कान्हा मधुसूदना कामिनी
मनमोहना । योगीध्याना हरस्मरणा गोपीध्याना मानिती कान्हा
बोलती यमुना ।। २ ।। नेणवसी नेणवसी । अकळुतु नाकळसी
।। धृ० ।। इंद्रनीळा श्रुतीजन किरळा सुरीजन घनसावळा । कंठी
माळा कौस्तुभ गळां प्रीति तुळसीवळा कासे सेला सोनसळा
उभा बळिभद्रा जवळा ।। ३ ।। कृष्ण सावळा डोळसु । सहज परम-
हंसु ।। धृ० ।। सदानंदा श्रीमुकुंदा श्रीहरी परमानंदा आनंदकंदा ।
अभय प्रल्हाद पावक नादा धेनु लुब्धा गोपाळा गोविंदा ।। ४ ।।

कृष्ण आमुचा आमुचा । खेळिया गौळियाचा ।। ध्रु० ।। कर्पूरगोरा मनस्थिरा पुराणा गुणगंभीरा विरादिविरा महावीरा । पांडवदळ-साहकारा मथुरा नगरा कौंसासुरा । शिक्षा लाविली चाणुरा अतिसुंदरा तूं पंढारा बापरखुमादेवीवरा ।।५।। जाणितलें जाणितलें । माझें मज दीधलें ।। ध्रु० ।।

६९ चालता लवडसवडी । बाहुली मुरडली । माथां गोरसाची दुरडी । जाय मथुरे हाटा । सर्वचि विचारी जीवीं । महियातें सादावी । तंव तो अवचित पालवी । नंदानंदनु ।। पाहे पां सुखा-चेनि मिसें । म्हणों करी अनारिसे । तेव्हां उरलें ते कैसे । माझें मनुष्यपण ।। विनवी सखीयाते आदरें । तुह्मी गुह्याचीं भांडारें । अघटित घडली या शरीरें । प्रगटित न करा साजणी वो ।। १ ।। काय करणें वो काय करणें वो ।। ध्रु० ।। देखोनी सावळी तनु । लुब्धला माझा मनु । लागलेंसे ध्यानु । द्वैत निवडे ना ।। डोळा भरूनिया बाळा । देखे श्रीरंगु सावळा । वेधे वेधल्या सकळां । गोपी गोविंदासवे ।। ठेला प्रपंचु माघारा । भावो भिनला दुसरा । पडिला मागील विसरा । कैचें कैचें आपुलेंपण ।। सहज करितां गोष्टी । पाहातां पडिली मिठी । जाली जन्मेसाठीं । सखिये साजणी वो ।। २ ।। ऐसी सोसिता सोसणी । सखी झाली विरहिणी । आजि मथुराभुवनी । मज गमेल कैसे ।। सरेल सांजणे विकणें । निवांत राहिले बोलणें । पूर्ण गोरसा भरणें । माथा त्यजूनिया ।। जाली अकुळांचे कूळ । तनु जाते बरळ । फिटले भ्रांती पडळ । दोन्ही एक झाली ।। बापरखुमादेवीवरी । अवस्था लावुनी पुरी । भावें भोगुनी श्रीहरी । मनमुक्त साजणी वो ।। ३ ।।

७० ज्ञान हेचि गाय दूध दुभिले भरणा । दोहीं तया जाणा हातु नाहीं ।। ठेविले अग्नीवरी नाहीं भितरी । तापलें पांड-भरी साथ नाहीं ।। १ ।। गौळणी चतुरे झडकरी । जाय मथुरे विकरा करी ।। ध्रु० ।। दहिया महियावीण घातले विरजण ।। मांडिले घुसळण रवियेवीण ।। करिती मंथन वरी आलें जीवन । एकलें आणून काढूं पाहे ।। २ ।। आलें गिन्हाईक न विकी

तूप ताक । नेणती विवेक गोरसाचा ॥ दह्रिया महियाच्या करूनी घागरी । लटकी उबरा उबरी काय करूं ॥ ३ ॥ ज्ञान हे घागरी वाह्रियेली शिरी । गोरस भितरी दाखवितो ॥ एके हाते सावरी झांकी तयावरी । चोखटिव करी गोरसाची ॥ ४ ॥ तंव मार्गी जातां पुसे एकी गौळणी । पारी बैसले दानी कीं नाहीं वो ॥ त्यासी नेदी मी दान जाईन मी आपण। प्रत्यक्ष प्रमाण काय करू ॥ ५ ॥ ऐसी पाराजवळी गेली तंव शब्दे ओळखिली । जावों दे गा वहिली उसिरू जाला ॥ या निर्वाणीच्या बोला सुखिया षंतोषला । निरोप दिधला गौळणीसी ॥ ६ ॥ ऐसी पावली मथुरा क्षण न लगे विकरा । सर्वेचि एकसरा उपरवा झाला ॥ बापरखुमादेवीवरू विठ्ठलु ग्राहकू । मानसी गोरसू ज्ञानेंसी मिळोनी गेला ॥ ७ ॥

७१ आचारचक्रीं निवणें मांडिले कैसा डेरिया उपचार केला । तिन्ही संयोगे गोमटे घुसळण रविबीजो मेरू वो ॥ तेणें आणिलें समयातें तेथें गुरूवचन लाधलें निरुते वो ॥ १ ॥ विद्यापात्रें गौळणी मंथन करू ब्रह्मज्ञानी वो । चाल निज निज पंथे कैसें नवनीत आणिलेंसें हाता वो ॥ २ ॥ गुरुउपदेशे रवि धरी अर्धउर्ध्व मंजिरी पांचे प्राण मंथन केलें निरुते वो । इडा पिंगळा कुंडळणीया ब्रह्मसूत्र दोरु तो आणिया वो ॥ उभी राहोनी गगनीं अनुहाते अंबर गर्जे वो ॥ ३ ॥ मन एकतत्वीं करी वो चित्त दृढ धरी वो । तयांमाजीं न विसंबो कांहीं वो ॥ ऐसा गोरसू चोखटू मोलेंवीण येतसे फुकटू । यासी न वेचे कांहीं चित्त बैसे समरसें ठायीं वो ॥ ४ ॥ गौळणी गोमटी हाती कसवटी क्षीरा निरा निवाडा करी वो । मेघडंबर न विसंबे तेथें घुसळिता थेंबु जो नुसळे वो ॥ जन पडलेसे धंदा गोरसा गोडी नेणती अंध वो ॥ । ५ ॥ काया हे नगरी गौळणी गोरसु । पुकारी नवही दारवंटे सांडुनी वो । दशव्देद्वारीं पातली कैसी विनटली गोविंदी वो ॥ दंभ विकरा झाला अधर्म धर्म लोपला वो । अवघी काया झांकुळली बापरखुमादेविवरा विठ्ठलीं वो ॥ ६ ॥

७२ आपुलेंनि रंगे येत होती ये साजणी । तंव एके वनवासी आलिंगिलें गे माये ।। १ ।। बोले ना बोलों देईना । तेथें पाहणेंचि अवघे पारुषलें गे माये ।। २ ।। आपुलें केलें कांहीं न चले वो आतां। बापरखुमादेविवरा विठ्ठलां देखतां ।। ३ ।।

७३ जळधराच्या धारी सिंधुजळ जयापरी । पुरोनियां उरे महीवरी रे गोवळा ।। तें जें शोकलें काई आणावया गेले । तैसी नवल तुझी कुसरी रे गोंवळा ।। १ ।। चाळा लावूनी गीवितोसी दाऊनियां लपसी ।। लपोनी केउता जासी तैसी माव न करी आम्हांसी रे गोवळा ।।२।। वायु काय वोखट चांग विचारूनि वाजे। तयांवीण कवण ठावो असे ।। तो आपुलिया चाडा कोडीवरी येरझारा । सेखीं गगनीं सामावला दिसे रे गोंवळा ।। ३ ।। आकाश तेंचि अवकाश तुजमाजीं । हें विश्व की तूं विश्वीं अससी ।। बापरखुमादेविवरा विठ्ठला न बोले । तुझें वर्म बोलतां निकरा ह्मणों जासी रे गोवळा ।।४।।

## विरहिणीचे अभंग.

७४ तुजवीण येकली रे कृष्णा न गमे राती । तंव तुवां नवल केलें वेणू घेउनी हातीं ।। १ ।। आलिये तेचि सोय तुझी वोळखिली गती ।। १ ।। नवल हें वालभरे कैसें जोडलें जिवा । दुसरें दुरी ठेलें प्रीति केला रिघावा ।। ध्रु० ।। पारु रे पारु रे कान्हा ह्मणें करिसी अव्हेरु । तूं तंव हृदयींचा होसी चैतन्य चोरु । बापरखुमादेविवरा विठो करी कां अंगिकारु ।। २ ।।

७५ मज तुरंबा कां वो जिये तिये । जेणें वेधें हरि सोयरा होये । मज लावा कां वो चंदन ऐसिये परीचे । जे लाविलियाची अनादि पुसोनी जाये वो ।। १ ।। मज करा कां वो माये कांहीं एक । जेणें करणें ठाके अशोख । सरा कां वो मज आडुनी मज पाहों द्या । आपुलें मुख गे माये ।।२।। मज शृंगारा कां वो तयां जोगी । पुढती अंग न समाय अंगीं ।। या मना पासोनी पढिये तो गोंवळु । तोचि

तो जिव्हारीं भोगीन गे माये ।। ३ ।। देह पालटा वो तयासाठीं। वरच या देईन अवघी सृष्टी । बापरखुमादेविवरा विठ्ठल संयोगी। तोचि तो त्यागुन भोगी गे माय ।। ४ ।।

७६ कृष्णें वेधिली विरहिणी बोले । चंद्रमा करितो उबारा गे माय। न लवा चंदनु आंगीं न घाला विजणवारा। हरिविणें शून्य शेजारु गे माय ।। १ ।। माझे जिवींचे तुम्ही कां वो नेणां । माझा बळिया तो पंढरिराणा वो माय ।।२।। नंदनंदनु घडी घडी आणा। तयावीण न वाचती प्राणा वो माये ।। बापरखुमादेविवरु विठ्ठलु गोविंदु । अमृतपान गे माय ।। ३ ।।

७७ घनु वाज घुणुघुणा । वारा वाजे रुणझुणा । भवतारकु हा कान्हा। वेगीं भेटावा कां ।। १ ।। चांदवो चांदणें। चापेवो चंदनु। देवकीनंदनु। वीण नावडे वो ।। २ ।। चंदनाची चोळी । माझें सर्व अंग पोळी। कान्हो वनमाळी। वेगीं भेटवा कां ।। ३ ।। सुमनाची सेज । सितळ वो निकी । वोले आगिसारिखी । वेगीं विझवा कां ।।४।। तुम्ही गातसां सुस्वरें। ऐकोनी द्या उत्तरें। कोकिळें वर्जावें। तुम्हीं बाईयांनो ।।५।। दर्पणीं पाहतां। रूप न दिसे आपुलें। बापरखुमादेविवरें विठ्ठलें मज ऐसें केलें ।। ६ ।।

७८ पांचा दामांचा धोंगडा नेसेन। उरली मोट ते मी जेवीन गे बाईये ।। १ ।। कामारी कामारी कामारी होऊन । या गोपाळाचें घर रिघेन गे बाईये ।। २ ।। त्याचा उंबरा उसिसा करीन । वरी येरझार मी सारीन गे बाईये ।।३।। निवृत्ति ज्ञानदेवा पुसतील वर्म त्यासी कामीन पुरेन गे बाईये ।। ४ ।।

७९ सांवळें परब्रह्म आवडे या जिवा । मनें मन राणिवा घर केलें ।। १ ।। काय करूं सये सांवळें गोंवित । आपेंआप लपत मन तेथें ।।२।। बापरखुमादेविवरु सांवळी प्रतीमा। मनें मनीं क्षमा एक झालें ।। ३ ।।

८० सांवळिये बुंथी सांवळिया रूपें । सांवळिया स्वरूपें वेधियेलें ।।१।। काय करूं गे माये सांवळे न सोडी । इंद्रिया इंद्रिय

जोडी एकतत्त्वें ॥२॥ कैसें याचें तेज सांवळें अरुवार । कृष्णी कृष्ण नीर सतेजपणें ॥ ३ ॥ ज्ञानदेव म्हणे निवृत्तीचे खुणे । सांवळेंची होणें यासी ध्यातां ॥ ४ ॥

८१ निरंजन वना गेलिये साजणी । तेथें निर्गुणें माझ्या मनी वेधियेलें ॥ १ ॥ सुखाची अति प्रीति जहाली गे ब्रह्मीं । श्रीगुरु निवृत्ति मुनी जाहलें गे माय ॥२॥ बापरखुमादेविवरु विठ्ठलु सहज सांवला । निर्गुण दाविला विसुरा गे माये ॥ ३ ॥

८२ मन मुरडुनी घातलें मनातें । थोरु मारु तेथें होत असे ॥१॥ पुरे पुरे वो आतां जिणें तें केउतें । येणें वो पंढरिनाथें वेधियेलें ॥ २ ॥ नचले नचले कांहीं करणें कामान । याचें पहाणेंची विदान कामानिया ॥ ३ ॥ बापरखुमादेविवरा विठ्ठलासी भेटी । संसारासी तुटी जाली गे माये ॥ ४ ॥

८३ निळियेच्या निशीं विरहिणी पिशी । शेजबाजे कैशी आरळ शेजे ॥ १ ॥ कृष्णसंगें वाली विव्हळ झाली निळी । चंदन अंगीं पोळी विरहज्वरें ॥२॥ ज्ञानदेव प्रेम निळारूप रूपसें सोहळा । कृष्णवेधें वेधली बाळा भली वसे ॥३॥

८४ निळिये निकरे कामधेनु मोहरे । निळपणें सरे निळे नभीं ॥ १ ॥ घुमत घुमत निळेमाजीं मातु । निळेपणीं देतु क्षेम कृष्णीं ॥२॥ निळिये सागरीं निळे निळेपणें सुंदरी । रातलीसे हरि विरहिणी ॥ ३ ॥ ज्ञानदेव सांगे निळियेचे बागे । निळासंगें बोळले गे निळोमाजीं ॥ ४ ॥

८५ येणेंरूपें पाहावासे तरि असुमाय होसी । माझ्या मना नाकळसी सांवळ्या ॥१॥ सगुणपणाची तुझी पडिलिसे मिठी । केली जीवासाठीं सांवळ्या । वेधला जिऊ माझा सिकवाल काई । सगुण ठाईं वेधिजेलें ॥ २ ॥ ये अंगणीं अवचिता देखिला बोलता । कोण ऐसा निरुता न कळे गे माये । सगुण म्हणोनी धरूं गेलें पालवीं । तंव नवलपणाची ठेवी प्रगट केली ॥३॥ आंतु बाहेरी कांहीं नकळे

वो मज। आपआपणिया चोज वाटोनी ठेलें। बापरखुमादेविवरें माझें मीपण चोरुनी नेलें। आपण ऐसें केलें बाईयावो ॥४॥

८६ जीवाचिया जीवा प्रेमभावाचिया भावा। तुज वांचुनी केशवा अनु नावडे ॥१॥ जीवें अनुसरलिये अझुनी कां नये। वेगीं आणावा तो सये प्रागु माझा ॥ २ ॥ सौभाग्यसुंदरु लावण्यसागरु। बापरखुमादेविवरु श्रीविठ्ठलु ॥३॥

८७ मी माझें म्हणतां ठकचि ठेलिये। आपुले जाति कुळ विसरुनी गेलिये ॥ १ ॥ गुणाचा दुकाळ पडिला देशीं। निर्गुणासी कैसी रातलिये ॥ २ ॥ बापरखुमादेविवर विठ्ठलु सयं। सेजारासी नये काय करूं ॥३॥

८८ पेंढारा दाऊनियां थोकसी। देखिलें पण केवीं जाये अंग लपविसी। तरी वेधा काय करिसी। मा शहाणपण तुझें नव्हे रे गोंवळा ॥१॥ आम्हीं येकवेध जीवें तुंवा केलें आधातुरें। वर्षावो वोसरलिया वोल्हासु जाय। तैसी न होत प्रेमळ उखरे गोंवळा ॥ २ ॥ देठीं गुंफलिया फुलें डाळलिया आहाच तंव कांहीं न दिसे रे। परी घ्राण इंद्रियांच्या अंगसुखा समर्थ कोण असे रे गोंवळा ॥३॥ या बोला मानवोनी बापरखुमादेविवरें विठ्ठलें दिधलें आपआपणियातें। तैंपासुनी तें लपणेंची पारुषलें उभा पंढरिये येणें वेषें रे गोवळा ॥४॥

८९ अवचिता परिमळु झुळकला अळुमाळु। मी म्हणें गोपाळु आला गे माये। चांचरती चांचरती बाहेरी निघालें। ठकचि मी ठेलें काय करूं ॥ १ ॥ मज करा कां उपचारु अधिक ताप भारु। सखिये सारंगधरु भेटवा कां ॥ध्रु०॥ तो सांवळा सुंदरु कासे पीतांबरु। लावण्य मनोहरु देखियेला॥ भरलिया दृष्टी जंव डोळां न्याहाळी। तंव कोठें वनमाळी गेला गे माये ॥२॥ बोधुनी ठेलें मन तंव जालें आन। सोकोनी घेतले प्राण माझे गे माये। बापरखुमादेविवरु विठ्ठल सुखाचा। तेणें कायामनेंवाचा वेधियेलें ॥३॥

९० पैल तो गे काऊ कोकताहे । शकुन गे माये सांगताहे ।।१।। उड रे उड रे काऊ तुझे सोन्यानें मढीन पाऊ । पाहुणे पंढरीरावो घरा कैं येती ।।२।। दहिंभाताची उंडी लावीन तुझ्या तोंडीं । जीवा पढिये त्याची गोडी सांग वेगीं ।। ३ ।। दुधे भरुनी वाटी लावीन तुझे वोंठी । सत्य सांगें गोठी विठो येईल कायी ।। ४ ।। आंबया डाहाळीं फळें चुंबी रसाळीं । आजिचे रे काळीं शकून सांगें ।। ५ ।। ज्ञानदेव म्हणे जाणिजे ये खुणें । भेटती पंढरीराणे शकुन सांगें ।।६।।

९१ आजि शुभ लवे लोचन् हरिखें सांगताहे शकुनु स्वप्न देखिलें सुंदरी । अलंकार लेववा चंदन चर्चावा जाति जुती पार्यातिके शेंवती करा आइती सेजारीं । शेला काढा मेचुचा हा दिन दैवाचा । सोहळा तो आमुचा मंदिरीं गे माये ।। १ ।। गुढिया उभवा मखरें शृंगारा भेटी होईल आळंगी । स्फुरण आलें बाहीं क्षेमालागीं पाहीं काचोळी न समाये अंगीं गे माये ।।२।। जिवीं जीव सुंदर त्याचेनी साचार तो मज भेटवा सुखाचा विसावा । सुमनें उकललीं नित्य दे माळी उचित करी तया भावा । आजी वेळु कां वो लाविला नेणों पंथीं सीणला बुझाऊं जाऊं त्याच्या गांवा गे माये ।।३।। हृदयीं निर्भर प्रेम वोरबार माझे चित्तीं राहो एक्य मज । दुजिये वस्तुलागीं रुत जाय माधवी मन्मथ करिता हे वोज । ऐसी तेथवरी जाईन सुखाची होईन नाचेन आनंदाचे भोजें गे माये ।।४।। ऐसा विपरीत लाघवी लपे सर्वेंची दावी वासिपे चौके । अभ्यासें अंतर पडलें येणें तरी मी त्यजीन जिणें म्हणोनी विनवितसे चतुर सुरेखे । रात्रीचे ठायीं देख मेघःश्याम बोलला अंबरीं गे माये ।। ५ ।। ऐसिये निवांत मूर्ति ऐकोनी ठेली श्रुती । आकर्षोनी चित्त चैतन्य भरोनी ठेले लोचन । ध्यानीं विसर्जिलें मन परमात्मया रामा तूं एक लाघवी सावेव पावलें ज्ञान । बापरखुमादेविवरा विठ्ठला सुमन संयोगीं आजी सत्य झालें माझें स्वप्न गे माये ।। ६ ।।

९२ गुणाचेनी आटोपें आकारलें ब्रह्म । भक्तभाग्य सम आलें मूर्ति ।। १ ।। चैतन्य परिपाठी ठसा घडलासे साकार । कृष्णची आकार गोकुळीं रया ।। २ ।। त्या रूपें वेधिलें काय करूं गे माये ।

नाम रूप सोय नाहीं आम्हां ।।३।। सबाह्य सभोंवतें चतुर्भुज सांवळें। सर्वभूतीं विवळे कृष्णरूपें ।। ४ ।। हरपले आकार कृष्णची क्षरला। वेदांसी अबोला श्रुतीसहित ।।५।। ऐसें परब्रह्म सांवळें दैतव आमुचें। आतां आम्हां कैचें क्रिया कर्म ।। ६ ।। बापरखुमादेविवरु विठ्ठलु दैवत। मनें घर तेथें चरणीं केलें ।।७।।

९३ सांवळी प्रतिमा धेउनी सकुमार। खेळत सुंदर गोकुळीं रया ।। १ ।। त्या रूपें वेधिलें काय करूं माय। अवघें निर्गुण होय पाचारीतां ।। २ ।। मीपणा ठाव नुरेची पैं सर्वथा। प्रपंचाची कथा ब्रह्म जाली ।। ३ ।। बाप निवृत्तिराजे दाविताती खुणा। नाम नारायणा पाठ कीजे ।।४।।

९४ त्रिभुवनींचें सुख पहावया नयनीं। दिनरात्रीं धणी न पुरे माझी ।।१।। विटेवरी सांवळा पहातां पैं डोळां। मन वेळोवेळां आठवितु ।। २ ।। सागरीं भरीतें दाटे तैसें मन उल्हाटे। वाट पाहों कोठें तुझी रया ।।३।। बापरखुमादेविवरु पूर्ण प्रकाशला। कुमुदिनीं विकासला तैसें जालें ।।४।।

९५ मायबापें आमुची विठोबा रखुमाई निजाची। त्याचीये गांवींची कोण्ही येतु न्यावया ।।१।। माझा विसावा माहेर वो पंढरपूर ।। ध्रु० ।। ऐशी वाट पहातसे जरु। ये सासुरा आमुची बहु वाहरु। काम क्रोध मद मत्सरू। मज आटिती दीरु ।। २ ।। अहंकार खेदिताहे भावा। दंभ प्रपंच या जावा। येरु न येरा घालिती हेवा। आपुल्या सवा ओढितसे ।। ३ ।। आवो चिंतेवोही निके वो ढाळे। तुज मज ठायींचें वेगळें। वोढुनी नेसी आपुल्या बळें। तुझ्या सळें नादतसे ।। ४ ।। आशा लागलीसे सर्पिणी। ग्रासूं पाहातसे पापिणी। रामनामाचीया ध्वनी। आइकों नेदी श्रवणीं ।। ५ ।। माझें सत्त्वबळारथी। धीरु धर्मु हा सांगाती। संतीं सांगितलें निवृत्ति। तरी मी जीवें वांचलिये ।। ६ ।। ऐसी दगदगल्यें सासुरवासा। विठोरखुमाई माझा कुवासा। निवृत्ति दासु तयाचा। जन्मोजन्मीं वोळगणा ।। ७ ।।

९६ पैल विळाचिये वेळीं। आंगणीं उभी ठेलिये। येतिया जातिया पुसे। विठ्ठल केउता गे माये ॥१॥ पायरऊ जाला संचारु नवल। वेदें विदान लाविलें म्हणे विठ्ठल विठ्ठल ॥ २ ॥ नेणें तहान भूक। नाहीं लाज अभिमान। वेधिलें जनार्दनीं। देवकीनंदनु गे माये ॥३॥ बापरखुमादेविवरु जिवींचा जीवनु। माझे मनीचे मनोरथ पुरवीं कमळनयनु गे माये ॥४॥

९७ यातिकुळ माझें गेलें हारपोनी। श्रीरंगावांचुनी आनु नेणें ॥१॥ किती वो शिकवाल मज वेळोवेळां। मी तंव गोवळा रातलिये ॥ २ ॥ अष्टभोग भोगितां मातें नाहीं चाड। भक्तिप्रेम गोड लेईलें गे माये ॥३॥ बापरखुमादेविवरु जीवींचा जिव्हाळा। कांहीं केलिया वेगळा नव्हे गे माये ॥४॥

९८ ज्याचिये आवडी संसार त्यजिला। तेणें कां अबोला धरिला गे माये। पायां दिधली मिठी घातली जीवें गांठी। साऊमा नये जगजेठी उभा ठेला गे माये ॥१॥ भेटवा वो त्यासी चरण झाडीन केशीं। सगुणरूपासी मी वो भाळलिये ॥ २ ॥ क्षेमालागीं जीउ उतावेळ माझा। उचलोनी चारी भुजा देईन क्षेम ॥ कोण्या गुणें कावो रुसला गोवळु। सुखाचा चावळू मजसी न करी गे माये ॥३॥ ऐसें अवस्थेचें पिसें लाविलेसें कैसें। चित्त नेलें आपणिया सरिसें गे माये ॥ बापरखुमादेविवरें लावियेलें पिसें। करुनी ठेविले आपणिया ऐसें गे माये ॥ ४ ॥

९९ देऊनियां भेटी मजसी न करी गोठी। लांचावला जीउ पाठी न राहे वो ॥ निष्ठुर म्हणो तरी अपंगीतो मातें। व्यापुनी जीवातें उरी उरवितो ॥१॥ तो दाखवावो माये धरीन त्याचे पाये। तयालागीं जीऊ आहे उतावेळु ॥ २ ॥ भेटीचेनी सुखें मनची होय मुकें। तें रूप देखें परी बोलवेना ॥ सगुण गुणाचा म्हणोनी घातली मिठी। तंव तो आपणिया समसाठीं करुनी ठेलें ॥३॥ काय नेणों कामाण कैसें वो जालें। चित्त चोरुनी नेलें गोवळेनें। बापरखुमादेविवर विठ्ठलें अंग लपवुनी। चैतन्य चोरुनी नेलें गें माये ॥४॥

१०० सुख शेजारीं असतां कळी जाली वो पहातां। देठु फेडुनी सेवतां अरळ केलें ॥ १ ॥ अंगणीं कमळणी जळधरू वोले वरी वाफा सिपल्यावरी वाळून जाये ॥२॥ मोतियाचें पाणी वाहे निळिये सारणी । सगुणाची लावणी लाउनी गेला ॥३॥ अंगणी वोळला मोत्यें वरुषला । धन्य दिवसु जाला सोनियाचा ॥ ४ ॥ चोरट्या मधुकरा कमळीं घेतलासे थारा । मोतियांचा चारा राजहंसा ॥५॥ अंगणीं बापया तूं परस रे चांपया। असुवीं माचया भीनलया ॥ ६ ॥ वाट पाहे मी येकली मज मदन जाकळी। अवस्था धाकुली म्हणो नये ॥ ७ ॥ आतां येईल म्हूण गेला वेळु कां लाविला । सेला जो भिनला मुक्ताफळीं ॥८॥ बावन चंदनु मर्दिला अंगीं वो चर्चिला। कोणें सदैवें वरपडा जाला वो माये ॥९॥ बापरखुमादेविवरु माझ्ञ मानसींचा होये । तयालागीं सये मी जागी सुती ॥१०॥

१०१ प्रभा कळिकादीप शून्याकार हें स्वरूप। मुनिजनमानसीचें सुख येकलेपणें॥ बिंब अर्धबिंब अर्धमातृका तुर्या नातळे ज्यासी भानु तो दिठी केवीं धरावा । गुणातीत निर्गुणीं जे सहजीं सहजची सगुणीं विखुरे रया ॥ १ ॥ आपआपणिया पडे माय विसरु। मज आवडे तो नंदाचा कुमरु गे माये ॥२॥ म्हणोनी डोळियाचें अंजन आणि मेघःशाम बुंथीचें ध्यान। निडारलें वृत्ति नयन पाहों जावो॥ तेथें तें अनुमतें नलगे मतांतरें भावें देखणा होय देवो रया ॥ ३ ॥ डोळ्याचा डोळसु विचरे हा परेशु तोचि परमात्मा सर्वीं असे ॥ बापरखुमादेविवरु विठ्ठलु उघडा पुरविला सौरसु गे माय ॥ आम्हां जितांचि मरणें कीं मेलिया कल्पकोटी जिणें। निवृत्तीनें दाविलें परेशु रया ॥४॥

१०२ पंढरपुरीचा निळा लावण्याचा पुतळा । दिठा देखियेला डोळां बाईये वो ॥१॥ वेधलें वो मन तयाचिया गुणीं । क्षणभर न विसंबे विठ्ठलरुक्मिणी॥२॥ पौर्णिमेचें चांदिणें क्षणक्षणां होय उणें। तैसें माझें जिणें एका विठ्ठलेंवीण॥३॥ बापरखुमादेविवरु विठ्ठलुचि पुरे। चित्त चैतन्य मुरे बाईये वो ॥४॥

गे ज्ञान बहिणी ॥ ४ ॥ राउळीचे कऱ्हे हारपले हाटीं ॥ माणुस-प्रति झाडा घेताती ओठी ॥ ५ ॥ नवल विपरीत देखिलें सृष्टीं ॥ माणुसप्रति झाडा घेताती ओटी ॥ ६ ॥

१००० ॐकार अक्षरबीज रे । अमित्य भुवनीं प्रकाशूनि गेलें रे। ते मकाराचे पोटीं आहे रे ॥१॥ उकाराचा शेंडा पाही रे । एक-विसा मंद्रचळा भेदुनि गेले। या वेदबीज वेगळें परात्पर पाहे रे ॥ २ ॥ मागें बोलिलों तें ज्ञान रे । चोविसां अक्षरीं संध्यावळी सांगें रे । परी त्या अक्षराचें अमित्य आहे रे ॥ ३ ॥ चारि म्हणों तरी नव्हे रे । साही म्हणों तरी भुललीं बापुडी । मा अठरांचीं दशा ते काई रे ॥ ४ ॥ दाहा श्रुतीं शिऊ बोले रे । अठरा श्रुति विष्णुचें वचन। परि कल्पांतीं अक्षर नसे रे ॥ ५ ॥ पूर्णापूर्ण ऐसें ब्रह्म बोलती रे । तेथें पूर्ण अपूर्ण दोन्ही नाहीं । मातें कांहीं बाहीं अक्षर रे । तया रूप ना रेखा आहे रे ॥ ६ ॥ तेथें त्रिकाळ जति-गति नाहीं रे । नाहीं इंद्रचंद्र नाहीं आकाशभूमी रे ॥ ७ ॥ तरी वेद अक्षर गिवसावें कैसें रे । नगणित गुण गेले रे । सिद्ध ना साधक मंत्र ना तंत्र । मा तेथें जटाक्रमपद कैचें रे ॥ ८ ॥ स्थूळ नव्हे सूक्ष्म नव्हे रे धातु नव्हे मातु नव्हे । मा कांहीं नव्हे तें अक्षर होये रे ॥९॥ पर नव्हे परत नव्हे रे । ज्योति नव्हे अज्योति नव्हे । मा कांहीं न होऊनियां एक होय रे ॥ १० ॥ बुद्धि नव्हे शुद्धि नव्हे रे । वाट नव्हे घाट नव्हे मा खटाटीत नव्हे । मवाळ मवाळ नव्हे नव्हे रे ॥ ११ ॥ साच ना दृश्य नव्हे रे । दृश्य नव्हे मा अदृश्य नव्हे रे । वेदीं बोलिले ते होय रे ॥१२॥ सप्तपाताळा-तळ नव्हे रे । एकवीस स्वर्गांहूनी आगलेंचि आहे रे । बाविसा-हुनी परतें पाहीं रे ॥ १३ ॥ तेथें नाहीं बिंदु नाहीं नाद रे । नाहीं चक्षुपाद नाहीं कर देहे रे । देहादिक चतुर नाहीं रे ॥ १४ ॥ भ्रमु नाहीं भुली नाहीं रे । तें सतराव्याचे कळे प्रकाशलें रे । परि तेथें मन न राहे ठायीं रे ॥ ॥ १५ ॥ आतां सातवें पांचवें बोले ज्ञान रे । तेथें पांचही नाहीं मा सातही नाहीं । मा तें अक्षरशत सहस्रावेगळें आहे रे ॥ १६ ॥ मागें चौदा बोलियलीं साच रे ।

ज्ञानासि विज्ञान जाहालें मा । शेखीं बुडाला तो वायां रे ॥१७॥ मागें अक्षरें बोलिलीं बहुतें रे । पिंडब्रह्मांड जयापासून जाहालें । परगुणीं व्यापिलें ज्ञानविज्ञानसुख रे ॥ १८ ॥ सुखादि सुख तें म्हणों रे । जरि अमित्य वेदाची वाणी खुंटली । मा परी लक्षालक्ष नये परिमाणा रे ॥ १९ ॥ त्रिदशा त्रिदशपंचदशा पंचदश नेणतें रे । तें शतसहस्रांचे शेवटीं । आहे नाहीं ऐसें दिसे रे ।। २० ।। आत्मा परमात्मा दोन्ही सखे रे । ऐसें चतुरीं बोलतां लोक भुल–विले रे । परि अनुमाना नये वेगळा आहे रे ॥ २१ ॥ पासष्टीपुढें अद्वैत नेमू रे । द्वैत ना अद्वैत भेद ना अभेद । अक्षरझेंपकु तोचि भला रे ॥ २२ ॥ बुझों गेला पाहों गेला रे । तेथें दुसरें नांव ना तयासि जाहलें । त्या ठकाठक मौन्यामौन्य पडिलें र ॥ २३ ॥ तेथें जाणोनी नेणें पैं जाहालें रे । मन इंद्रियां लयो जाहाला । अमित्य तेजध्वनी उमटे रे ॥ २४ ॥ गगनापरतें अक्षर दिसे रे । दिसोन न दिसे तें वेदांचें देखणें । तेथें साहांसी शुद्धबुद्धपरतें रे ॥ २५ ॥ नव्यानऊ नव्यासि शून्य रे । ऐसें राधाजंत्र भेदावें कवणें । तें कृष्णावतारीं भेदियेलें पुरुषोत्तमें रे ॥ २६ ॥ आतां नव्यानऊ भाकरी रे । तें अर्जुनामुखीं घालतां भागला । तें अक्षर निरक्षर । आकारउकार मकार मा तें वळलें रे ॥ २७ ॥ सात बेताळीस घाली रे । पंचविसावें तेथें गुणागारी आटलें । निरालंबना पावलें घटाघटीं रे ॥ २८ ॥ तें व्योमाकाररूप नव्हे रे । तेज नव्हे त्रिकुट नव्हे । मा गोल्हाट नव्हे । मंडळा मंडळीं मंडळापरतें रे ॥ २९ ॥ अमित भुवनें चाकें त्यासि रे । निरालंब आंख घालूनिया बैसे । तें तुरंगेंविण अक्षर कैसें चाले रे ॥ ३० ॥ तें नित्य नव्हे अनित्य नव्हे रे । आकारा खूण गुडारु गुह्यारिलें । परि त्या विवरीं न दिसे अक्षर रे ॥ ३१ ॥ बारावें भेदूनि जाय रे । तेराव्याचें अग्रा अग्रीं दिसे । तें परेहूनि परतें आहे रे ॥ ३२ ॥ आठ कोटी लक्षी पाहें रे । तें मुक्त नव्हे अमुक्त नव्हे । मा अक्षर कांहीं नव्हे सिद्ध आहे रे ॥ ३३ ॥ पिवळें नव्हे पांढरें नव्हे काळें नव्हे रे । रंगारंगाकार नव्हे अनंत ध्वनि नव्हे । अक्षरनिःशब्दनिरंजन नव्हे रे ॥ ३४ ॥ षष्ठ नव्हे सप्त नव्हे रे । मन नव्हे पर नव्हे रे । तें बुडालें बुडोनी

नव्हे रे ।। ३५ ।। सत्ताविसें एकतिसें दाटूनि पाहे रे । छत्तिसांचा चौभागीं भागों तरी अप्रमिता । अप्रमीत जाहालें रे ।। ३६ ।। सहस्रशून्य सहस्रा ठायीं रे । बावन अक्षरीं गुण निवडती । तें कूटस्थ कूठाकूटीं नाहीं रे ।। ३७ ।। मागें बोलिलासि भुभु:कारू रे । स्वर ना भेद सत्य वेदरूप बोलियेलें तूं आपणयातें नेणतां । नेणोनि म्हणविसी ब्रह्म रे ।। ३८ ।। विकासलें व्योमाकार रे । तिन्ही देव तिन्ही वेद जाहाले । मा तरी खूण चुकोनियां माघारे मागुती मुरडले रे ।। ३९ ।। हा अनुवादु नकोबोलों रे । नष्टहातीं निजपद दिधलें । ब्रह्म अन्वयें सोडून नको बोलों रे ।। ४० ।। वाडापरिस वाड आहे रे । एकुणिलावे अक्षरीं मंत्र साधूं गेलासी । परि तें कांहीं नाहीं ऐसें जालें रे ।। ४१ ।। रकारीं बोध बोधसी रे । तेथें घटीं तें विघटीं तें के न पडेची । त्या मंडळा मंडळीं गुंतलासी रे ।। ४२ ।। नकाररूप शून्य रे । सहस्राचियें वाटे एक फांकलें । मातें अक्षरासि भेदु नाहीं रे ।। ४३ ।। यमनेम काय करिसी रे । गुरुमुखें सांगतां वायां भ्रमले । आपणपा नाहीं शुद्धि रे ।। ४४ ।। भाबांविलें मन बुडविलें रे । मार्गु ठावा न पडतां उगलें । मध्येंचि उडोनि आलें रे ।। ४५ ।। गति मति वेदु बोले रे । सातवी मातृका सहस्रीं वांटियेली । तेथें गुण लयो जाहाला रे ।। ४६ ।। दिधलें मन पांचा ठायीं रे । पांचे पांच भागुवि भागु जाहाला । तेथें ब्रह्मरसु रसीं मुराला रे ।। ४७ ।। वासुकीमणिमथन केलें रे । तिहीं देव तेथें संध्यावळीं ठायीं बुडाले । मा तरि सहस्रमुखीं लेखा काय सारे ।।४८।। साहाव्याची गोठी वळू पाहे रे । अगाध ब्रह्माच्या गोष्टी । करिती सत्यब्रह्म त्याच्या पोटीं रे ।।४९।। ध्यान कल्पितां न पविजे रे । आपुला आत्मा शुद्ध चैतन्य देखिल्या तें चित्तें । ब्रह्म ब्रह्माकार होय रे ।।५०।। मधुर मधुर अनुभवरसु रे । तेथें संवादु ना गोडि तिखट ना पैत्य तें अंबर अंबराकार रे ।।५१।। हरि म्हणिजे ठकार शून्य रे । पांचवे पुढें विठुलें दिधलें । तें नववें पुसूनि जाय रे ।। ५२ ।। विधि म्हणसि ध्याना अगोचर रे । जयाचा एक्यण्णाउ मातृका भेदिल्या । तें त्रिपुटी फुटोनि जाय रे ।। ५३ ।। योनिमंत्र येकु साधू रे । आठिजनीं तेथें उभें राहूनियां । अकराव्याचें तोंड

मारी रे ॥ ५४ ॥ येणें जाणें परि नाहीं रे । सिद्धसाकार भाविसि काय । अयोगायोगु तें नव्हे रे ॥५५॥ नाटटा भाविसि काय रे । नकारशब्द नामात्मक नाहीं । तें न होनि जाय रे ॥ ५६ ॥ पराहूनि परता आहे रे । अमित व्योममंडळें भेदूनि तें । मातृकेचें नांव काय रे ॥ ५७ ॥ चेउ आलिया निजसुदा नव्हे रे । निज चेतविलें जागें निजविलें । दगदगीं फुटीं घाली रे ॥ ५८ ॥ तेथें बावन्न त्रेपन्न एक म्हणतील रे । त्यासि लावावया मा आणिक बंधु नाहीं रे ॥ ५९ ॥ यासी उपावो नाहीं अपावो नाहीं । तेथें कांहीं तें घेऊनि राही रे ॥ ६० ॥ तत्त्वा तत्त्वभेदु नाहीं रे । महत्तत्त्वाचें सामर्थ्य जाशील । तेथें आपण नाहीं कांहीं नाहीं रे ॥ ६१ ॥ एका शेंडाये काडिरी रे । एकतत्त्वें तळातळ भेदियेलें । वोंकारें भेदियेलें परात्पर रे ॥ ६२ ॥ सत्य व्योमा शून्य देई रे । चौदावें बुडवूनि घालुनि पाहे । मा पुढें वेदबीज सांगेन रे ॥ ६३ ॥ जटि ब्रह्मऋषि बोलती रे । पदापदार्थ कर्मखंडीं विखंड । मा त्यासि नकळे त्या अक्षराचें पारू रे ॥६४॥ कर्मकांडीं एकबीज आहे रे । संकल्पीं विकल्पीं एकोविष्णु बोले । परि ब्रह्मार्पण नाहीं ठायीं रे ॥ ६५ ॥ एकु पदार्थु बोले रे । तें चोविसाक्षरी संध्यावळीबीज मिरवलें । एकु आपोनारायण म्हणे रे ॥ ६६ ॥ एक ध्रुव ध्रुव म्हणति यजु रे । यजन याजन अध्ययन अध्यापन । दान प्रतिग्रहो नाहीं रे ॥ ६७ ॥ रुकारु म्हणती मूळ रे आब्रह्म म्हणती परतल्या दृष्टि । मा साम मागति फळ रे ॥ ६८॥ सत्यलोकीं विरिंची विचरे रे । शंकर विश्वाचि आहुति केली । हरि कार ठेवा ठेवी रे ॥ ६९ ॥ बोध्य म्हणती निजरूप जाणे रे । गण म्हणति सिद्ध पातलीया । शक्त म्हणे शक्ति पोटीं रे ॥७०॥ कमळें हातिं घेऊनि उभे रे । उदयो अस्तु नमस्कारु कारसि । मात अशक्यासी नपडे अक्षर ठावें रे ॥ ७१ ॥ एक शैव म्हणति शिवज्योतिर्लिंग पाहों रें । भगता भागवता नपडेचि ठायीं मातें पावले निवृत्तिचे पाय प्रसादीं रे ॥ ७२ ॥ निवृत्ति म्हणे सोपाना भला रे । अक्षराचें वर्म अवघें पूर्णपक्ष जाहालें । तें अक्षर तुम्हां भदलें रे ॥ ७३ ॥ मूळ सांडि शेंडा सांडि रे । न घटतां घटण घटाघटी केली । तरी ब्रह्म ब्रह्मीं चोखाळलें रे ॥ ७४ ॥ अचिंतन

प्याली रे । ज्ञान सोपानाचा निवृत्ति चोडळी । तें अक्षर त्रिपत्रीं तिन्ही मोडली रे ॥ ७५ ॥ ब्रह्मसमुद्र धोंटिला रे । तृषेक्षुधेवीण पंचप्राण पै खादले रे । तिखाव्यासि मारिलें तुम्ही रे ॥ ७६ ॥ धगधगीत ब्रह्मशस्त्र आहे रे । अमित ब्रह्माचें तेज प्रकाशित । तेज तेजाठायीं विरे रे ॥७७॥ एक रोमकूपीं उगवला रे । त्याचे अनंत गुण मा अनंतपार मा । तो विष्णु भला भला भला रे ॥ ७८ ॥ ते दोघे कर्मधर्मसाधक भले रे । ते अमित्य भुवनें धांडोळितां भागले । परी ते निर्गुण अक्षराची नलगे सोय रे ॥ ७९ ॥ आदिदेवी माया जाली रे । एक वैष्णवी म्हणती अद्भुती म्हणती । चौथी तिघांसि खाय रे ॥ ८० ॥ निरंजनीं एकी उभी रे । सिद्धसाधक मा वेदांत बोलिजे । ते रंजना संध्यावळी माय रे ॥ ८१ ॥ अठरा वर्ण अठरा वर्ण अठरा ज्ञाती रे । चहूंची वेदें सांगितली संमति । ते निरालंबीं नाहीं स्थिती रे ॥ ८२ ॥ सुयीच्या अग्रीं दाभण ठेवावे रे । अमित्य ब्रह्मांडें तयावरि जालीं । ऐशी निजब्रह्माक्षराचीं नकळे माया रे ॥८३॥ मायाकोश आड जाले रे । ते तेजीं तेज फोडुनी गेले । सातें सस्वरूप अक्षर कवणें ठायीं रे ॥ ८४ ॥ चौदा चारि चौदा घाली रे । चौदा चौके चौदा वांटुनि गेले । माते ब्रह्मांडाची वाट कोण रे ॥ ८५ ॥ अक्षरामागें अक्षरसहस्त्र जालें रे । लक्षलक्षाची क्रोडी क्रोडीची अनंतवाटाघाटी । निघंटीं पाहिल्या रे ॥ ८६ ॥ चतुरबुद्धि सांगवले रे । चतुराननु चौमुखीं खोंचावला । पंचमुख सहस्त्रमुख खुंटावले रे ॥ ८७ ॥ तळवा घोंटीं जानु नाभि वक्षस्थळीं कंठ शेडे गेले रे । शेंडीच्या अग्रीं चौदा भुवनें मावळलीं । तें विराट लया लक्ष गेला रे ॥ ८८ ॥ अटत घाटत घटली रे । तेथें नादु नाहीं स्पर्श नाहीं । कांहीं नाहीं ते अवघी लया पाही रे ॥ ८९ ॥ ऐसा उत्पत्तिगोळकु । पिंडब्रह्मांडगोळकु सांगितला रे । ठाऊकें नव्हे म्हणोनि बुडाले । त्या अवताराचा काय ठावो रे ॥ ९० ॥ ऐसा उत्पत्तिगोळकु । देवऋषि मुनिशुकादिक रे । साही अंगें बोलोनि गेले । मा त्या चहूंचा गड संदेह पडला रे ॥ ९१ ॥ तेथें सत्तावन्नें सहस्त्र धातू रे । एक ज्यापासूनि मोवितां भागले । अमिता मुखीं वर्णितां गेले रे ॥ ९२ ॥ शून्य वोढिलें निरशून्य

भेदिलें पाहा रे । देवा देवो दैव तें बोलती । तें ब्रह्मज्ञान सोपान-कर्णपुटीं पेरियेलें ब्रह्म रे ।। ९३ ।। श्रवणेंवीण ऐकिलें रे । मनेंवीण मन बुडालें रे । मागें गिवसितां गिवसितां स्वस्वरूपीं आहे रे ।। ९४ ।। निवृत्ति म्हणे ज्ञान सोपाना दोन्ही भागीं राहे रे । संध्यावळी अजपामंत्रसाधन । त्याणें उपदेशें तें तें ब्रह्म पाहे रे ।। ९५ ।। म्हणसी मनासी नयन आहे रे । तें मनचि नाहीं मा अवघे ब्रह्मचि पाही । मा माझा हस्तातळीं उभे राहा रे ।।९६।। अचिंतन चितूं नये । संध्यारागु मंत्र पंचकरणें मथिला । त्या अक्षरासि नाहीं भेदु रे ।। ९७ ।। तें ब्रह्मा ब्रह्मसार रे । त्रिकुटा–वेगळें गोल्हाटा वेगळें । न चुकत चुकलें पाही रे ।। ९८ ।। रवी–सोममाथीं माथां बैसलें । तें अधरेंवीण उदरेंवीण । सामावलें आहे रे ।। ९९ ।। चिदप्रचिद तेजातेज नव्हे रे । अमित भुवनें जयाचेनि आहारळलीं । तेथुनी निःशब्दांपासूनि वेद जाहाला रे ।। १०० ।। ब्रह्मवृक्ष व्योमीं फुलला रे । त्यासि शाखा ना मूळ ना बीज ना अंकुर । तें अक्षर फळेंवीण फळ देखा रे ।। १०१ ।। सहस्र खांदि-यांचें एक झाड रे । जयाचीं विश्वपत्रें विश्वशाखा । मा त्याचें अंग कूपीं एक ब्रह्मफळ रे ।। १०२ ।। यजुरि ऐशा ऐंशी शाखा जाहाल्या रे । ऋगीं सप्तशाखा जाण बोलियेले । तें अथर्वण राहे श्यामफळ रे ।। १०३ ।। ऐसें बोलता अनंतफळ रे । परि त्या अक्षरासि नलगे फूलफळ । ज्याची ते निष्कामीं निष्कर्मीं फळेंविण कैसें फळें रे ।। १०४ ।। आणिक एक सांगेन गूढ रे । त्यासि सोळा ना बारा । नवासि शून्य देतां दाहा । अकराही शून्य मिळे रे ।। १०५ ।। ऐसें छत्तिसा गुणांचें बत्तिसावें वाटा रे । मिळालें पंचीकरणीं मिळालें संध्यावळीं । परि त्या नकळे अक्षराचा भेदु रे ।। १०६ ।। एकावन्नें बावन्नें मिळाले सत्तावन्नें रे । परि तें अक्षर निरंजन निराकार निर्गुण । ऐसे गुणिती पैं ते शाहाणे रे ।। १०७ ।। अडतीस पंचविशी पांच मारी रे । निरशून्याकार भंगा भेदून गेले । मापारि निःशब्दीं परावाट पाहे रे ।। १०८ ।। धगधगित एकसुरी होती रे । ते व्योमाचा पोटीं फोडूनि भेदली । ते अक्षरासि वाहे वाट रे ।। १०९ ।। एक आप एक पर रे । पिंड

ब्रह्मांडाचे अक्षरीं निवडलें। सातवें गोल्हाट भेदिलें रे ॥ ११० ॥ तेथें विजया एक राणी रे। काळातें खाउनी महाकाळ गिळिला। ब्रह्मबोवरी तिचें नांव रे ॥ १११ ॥ तेथें एक होता अक्षरसिद्धावळी रे। अंतकाळ तप्तमुख जाला। शब्द नेदेखे फिरोनी आला रे ॥ ११२ ॥ आतां एक सांगेन अमित व्योमावरि फुललें रे। त्या अक्षरा बांधूनि बंधेवीण धरिलें रे। ज्ञान सोपानासी म्यां दिधलें रे ॥ ११३ ॥ ज्ञान ज्ञानें भला म्हणवी रे। सोपान सिद्धिनिधिब्रह्म पावला रे। तेणें ज्ञाना ब्रह्मबोध जाला रे ॥ ११४ ॥ अद्वैतपंथ कैसा रे। ऐक्यवादु वेद बोल बोलती वचनें। ते मिळणी ब्रम्हींचे सांगेन त्रिसंध्याकाळीं रे ॥ ११५ ॥ ते वर्ण कवणा नेघे पवे रे। अनुभविया अटक कुटले। मन ते ज्ञानी म्हणती वांया रे ॥ ११६ ॥ जेथें मौन्य मौन्य साध्य नव्हे रे। पांचमाळनि सस्वरूप होतें। मातेंचि अनुभवाची खूण रे ॥ ११७ ॥ मनीं शंका धरूं नको कांहीं रे। चतुर्देहांसहित मन मावळी। मा तरि ब्रम्हबीज तूंचि होशी रे ॥ ११८ ॥ सा सा सा चौदावरि ठेंवी रे। हा भेदु कोणी जाणितला म्हणती। तरि त्यांसि मानु मी देईन म्हणती निवृत्ती रे ॥ ११९ ॥ आतां एक गुह्य परम गुह्य रे। तें अक्षराशेवटीं दाही दिशे नाहीं। तें सहस्त्रलक्षणीं गुणीते आहे रे ॥ १२० ॥ हें गुणितां शास्त्र जालें ज्योतिषी रे। तेही वेदाच्या पोटीं धांडोळित आहातीं। त्या अक्षराचा नकळे अंतीं अंत रे ॥ १२१ ॥ भर्डभिग भर्डभिग भयानक जाले रे। परि त्यांस सहस्त्रसिद्धि सहस्त्रमुखी बुद्धि। मा बावन्न अक्षरांवेगळें तें वाटे रे ॥ १२२ ॥ ऐसें अमित्यभुवनाचे साठे मावळले रे। चंडाहूनि प्रचंड थोटावलें। तें अक्षराचे न कळे पारु रे ॥ १२३ ॥ जें निःशब्द अंकुर फुटे रे। वायूसी मोवणी आपसी भिजवणी। व्योमाची ठेवणी कवण ठेवी रे ॥ १२४ ॥ मानासि नाहीं मारणी रे। तेजासि नाहीं धरणी। धरूं गेला तो वायांविण श्रमला रे ॥ १२५ ॥ परि एक निर्वाण सांगेन रे। आम्हीं तिघीं मा जेथुनी तृषाकारलों। तें जीवनीं जी जैसें मिळोनि गेलें। मा तैसी परि जाशी आम्हां तुम्हां रे ॥ १२६ ॥

१००१ जीवन कैसें तान्हेजत आहे । मन धाले परि न धाये ।। १ ।। पुढत पुढती राजा विठ्ठल पाहे । निरंजनी अंजन लेईजत आहे ।। २ ।। आपुलें निधान आपण पाहे । निवृत्तिप्रति गाऱ्हाणें मांडले आहे ।। ३ ।। बापरखुमादेविवरू विठ्ठलाचे पाये । विसंबला क्षण माझा जीवूं जाऊं पाहे ।। ४ ।।

१००२ सुमनाची लता भ्रमराची ओढी । तैसी तुझी गोडी लागो मज ।। १ ।। अविट गे माये कदापि विटेना । जवळी आहे परि भेटेना साच ।। २ ।। लागलिया तृषा जीवनातें वाळी । तैसी तुझी गोडी लागो मज ।।३।। बापरखुमादेविवरू विठ्ठलेसी आवडी। गोडीयेसी गोडी मिळोनी गेली ।। ४ ।।

१००३ दुरी ना जवळीं त्रिभुवन मंडळी । ते मनाचे मुळीं बैसलेसें ।। १ ।। बोलों जातांच जेणें जिव्हाची खादली । पाहत पाहत गेली चर्मदृष्टि ।। २ ।। दातांविण जेणें स्थूळ देह खादले । शस्त्रेंवीण तोडिलें लिंगदेह ।। ३ ।। निवृत्तिदेव म्हणे परियेसी ज्ञान । अनुभवेंवीण मना परिचय नये ।। ४ ।।

१००४ पहा पहा पहा तें पाहिलिया परते । पाहिलिया तेथ तोचि दिसे ।। १ ।। तें तूं आपण गुरूमुखें जाण । नलगे साधन आणिक कांहीं ।। २ ।। ज्ञानदेव म्हणे न धावे बा सैरा । बापरखुमादेविवरा विठ्ठलू गा ।। ३ ।।

१००५ नवांहुनि वेग रे । ते सातांहुनी सहस्त्र आगळी रे ।। ते परेहूनि परती रे । ते कळावी कवणें बुद्धि रे ।। १ ।। धेनु ते निरंजनीं दुहितां न संवरे । तिचा पान्हा अपार रे कान्हो ।। २ ।। सोपान म्हणे ते गुरुमुखें जाणा रे । ते ओळखावी अजपा खुणें रे ।। ते संध्यावळी मायेचा पान्हा रे । तिचें क्षीर गोडीस आहे रे कान्हो ।। ३ ।।

१००६ पुंडलिकाचें भाग्य वर्णावया अमरीं । नाहीं चराचरीं ऐसा कोणी ।। १ ।। विष्णुसहित शिव आणिला पंढरी । केलें

भिमातिरीं पेरूणें जेणें ॥ २ ॥ ब्रह्मादिकां अंत न कळे ज्या रूपाचा । एवढी कीर्ति वाचा बोलों काये ॥ ३ ॥ निवृत्ति सांगे मातु विठ्ठल उच्चारें । वैकुंठ उतरे एक्या नामें ॥ ४ ॥

१००७ नमो फालकौतुहला । नमो चक्रचालका गोपाळा । नमो विश्वप्रतिपाळा । प्रभंजना ॥ १ ॥ नमो शिवशिवेशा । नमो शिवादि विश्वेशा । नमो रूपा अष्टदिशा । व्यापका नारायणा ॥२॥ नमो सकळगर्भोद्भवा । नमो चित्तचालक भावा । नमो विष्णु-मूर्ते देवाधिदेवा । श्रीविठ्ठला ॥ ३ ॥ नमो भजनशीलाव्यापका । नमो ज्योतिर्लिगा दीपका । नमो नमो तुज एका । आत्मव्यापका जगत् गुरु ॥ ४ ॥ नमो श्रीये श्रीनिवासा । नमो आगमपरेशा । नमो ज्ञानगम्याधीशा । प्रतिकुळा ॥ ५ ॥ नमो स्वलीला विनटा । नमो स्तुति वैकुंठपीठा । नमो रूपादि श्रेष्ठा । वैकुंठीचिया ॥ ६ ॥ नमो दर्शनस्पर्शना । नमो उपरती निधाना । नमो तितिक्षा दारुणा । कमळालया ॥७॥ नमो त्रिगठी आदटा । नमो त्रिगुणा तूं उद्भटा । नमो सत्वरूप सदटा । ब्रह्मनामा ॥ ८ ॥ नमो रजेश्वरा हरि । नमो विगळित संहारि । नमो वाचा वक्ताकरी । वाचाळ वाक्पुष्पीं ॥ ९ ॥ नमो तम हर्ताकर्ता । नमो सकळ संहर्ता । नमो काळकाळू दाता । रक्षिता हरिभक्ता ॥ १० ॥ तुज नमो हरहरेश्वरा । नमो न देखों दुसरा । नमो वेदांत सागरा । सर्वेश्वरा तुज नमो ॥ ११ ॥ श्रुती निरामया नमो । नमो ज्ञानरूपा नमो । नमो द्वैतनिरसना नमो । करी तू निजकरें ॥ १२ ॥ नमो व्यक्ता-व्यक्ता हरी । नमो माया संहार केसरी । नमो सर्वांच्या माजि घरीं । नांदसी तूं आत्माराम ॥ १३ ॥ जिव शिव नमो तुज । नमो सर्व जीवबीज । नमो तूंचि सहज । श्रीविठ्ठला ॥ १४ ॥ लीलेस्तव नटारंभ । नमो जगदादिखिळस्तंभ । उभा राहोनी प्रतीभ । भीमा-तीरीं पंढरिये ॥१५॥ नमो ऐशिया रूपेशा । नमो त्रैलोक्य विस्तार ठसा । नमो आदि परेशा । जगदादीशा युगादी ॥ १६ ॥ नमो पुरुषोत्तमा परेशा । नमो सकळही उदासा । करूनी जीवरूप ठसा । नांदसी तूं चराचरीं ॥ १७ ॥ मधुसूदना तुज नमो । मधु माधवा

हृदय रमो । नमो मधुर गीत तमो । माजि घरीं आत्माचिये ॥१८॥ त्रिविध तिमिर नाशा । परम परमानंद उल्हासा । नमो पुरविसी आशा । हरिभक्तीची श्रीहरी ॥ १९ ॥ नमो वासना चक्रवाळी । नमो तुंडवितंड गेली । नमो सर्वही हरिली । प्रपंच रचना ॥२०॥ नमो श्रीधरा श्रीकरा । नमो सर्व संगीविकारा । नमो विकृति विकारा । हरिसी नामें एके ॥ २१ ॥ नमो शांति दया क्षमा । नमो कृपाकरा पुरुषोत्तमा । नमो कासव दृष्टिसमा । निष्कलंक नाथा ॥ २२ ॥ नमो विश्वाद्य छेदका । नमो एकार्णवपावका । नमो द्वादश एका । सुभाषका वेदवक्ता ॥ २३ ॥ नमो चित्तचकोर हर्त्या । सर्वकारण कार्यकर्त्या । नमो तुजवाचोनी सत्या । विवेक प्रत्यया पैं नये ॥ २४ ॥ नमो अद्वैत अनंता । नमो निर्द्वंद्व भोक्ता । नमो नित्यानित्य सरता । तुज नमो नमो ॥ २५ ॥ नमो दुर्गति-हरणा । नमो सर्वहरण भरणा । नमो सर्वदुष्ट निवारण । भयहरणा जगदीशा ॥ २६ ॥ नमो शिवशक्ति समलिंगा । नमो भक्षक काळवेगा । रुद्रादिव्या वसुपेंगा । सम सर्वांगा परमपरेशा ॥२७॥ नमो कृत्रिम दहना । नमो कृश करण हरणा । नमो प्रतिपाल–करणा । नारायणा तुज नमो ॥ २८ ॥ नमो इंद्रियें नियंत्या । नमो प्रपंच अकृत्या । नमो दीनादित्या । सकळ बुद्धि तूंची ॥२९॥ नमो अवधूत दत्ता । नमो अपरमितमिता । नमो सर्वावरिष्ठ सत्ता । तूं चाळिता हृषीकेशी ॥ ३० ॥ नमो दुष्ट दर्पादर्पा । नमो चमत्कार गंगा सर्पा । नमो मनोहरण पापा । नमो स्वल्पा रामकृष्णा ॥ ३१ ॥ नमो चतुर वेददीप्ता । नमो हरणकरण तूं सुप्ता । जागृती स्वप्न गुप्ता । सत्य सुप्ता महाविष्णु ॥ ३२ ॥ नमो देवेश्वरें सूक्ता । महा मोहा महाहर्ता । मंदमंद नियंता । नमो नारायणा ॥ ३३ ॥ क्षीर नीरनिर्झरा । नमो विदग्ध अनुकारा । नमो विवेकसारा महानादा ॥ ३४ ॥ नमो मुखवंत सदना । नमो भक्षकभुवना । भोक्तावरा शुक्लवर्णा । दयाघना गुणनिधी ॥३५॥ मृतामृता नमोनमो । नमो श्रुतिशास्त्रसमो । नमो हा गर्वगमो । पद्म गर्भानंतानंता ॥ ३६ ॥ नमो चिदाकाशव्याप्ता । चित्सत्ता चळण सत्ता । चित्स्वरूपादि रूपा । भुवनदीपा महामूर्ती ॥ ३७ ॥

नमो एक एकार्णव । नमो कल्पादि गुणवैभव । नमो सकळ हे देव । हे भाव पैं तुझे ।। ३८ ।। गो गोपाळा नमो नमो । गोविंद गुण विष्णुधर्मो । नमो चित्ताचित्त निर्भो । सर्व काळ तुझ्या चरणीं ।।३९।। ध्वज वज्रांकुशा । ध्वज नीळविकाशा । ध्वजांबरा अष्टदिशा । निळिमा भासती शामांकिता ।। ४० ।। सुषुप्तीचें जें सत्य । तें नमो तुज कृत्य । असो सजे अमित्य । तें तें क्षमा करी स्वामी ।। ४१ ।। नमो निर्धार नियंता । नमो सुखरूप दाता । नमो आलिया पदार्थां । क्षमा करी स्वामी ।। ४२ ।। नमो चित्तविभ्रमो । नमो धार्य धैर्य नमो । पुराणपुरुषोत्तमो । पाहें कासव दृष्टी ।। ४३ ।। पसार्य दाना नमो । परमपरेशा नमो । ध्यानांतर गमो । तुझ्या चरणीं केशवा ।। ४४ ।। आग्रह निहृत्या नमो । सुग्रह परी नमो । अनंता नित्य धर्मो । वैकुंठ गुणग्राम नमो नमस्ते ।।४५।। अनादृष्य दृष्यमाना । दृश्यादृश्य नित्य घना । सुखरूप जगज्जीवना । तुज नमो स्वामी ।। ४६ ।। दीप्तादीप्त अदृश्या । जीवन दिसती सादृशा । जीवमय हे भासा । तुज नमो स्वामी ।। ४७ ।। परम परब्रह्मा । आदिब्रम्हा तूं रामा । भक्तालागीं तूं साङमा । तुज नमो ।। ४८ ।। नमो नमो एकतत्त्वा । बाह्यमुद्रा शुद्धसत्वा । योगारूढ परतत्वा । सबाह्य पावसी तुज नमो ।।४९।। वेदादि परम वक्ता । वेदादि तूंचि कर्ता । तुज वांचोनी सर्व सत्ता । नमो भक्ता न देखों ।। ५० ।। ज्योतिर्मय रूप तुज । सर्व तत्त्वा तूंच बीज । नमो तुज सहज । पुढती पुढती नमो नमो ।। ५१ ।। परब्रम्ह परात्पर । परम तत्व परम सार । परम गुह्य परम विचार । तुज नमो नारायण ।। ५२ ।। दिघड विघड सुघड । जाड जड अवघड । द्वैताद्वैत जोडा-जोड । कर्ता कार्यता तुज नमो ।। ५३ ।। संख्यारहित जीवना । असंख्य जीव पाळणा । नमो तुज संजीवना । पुंडलिक धना पांडुरंगा ।। ५४ ।। निर्गुण सगुण रूपा । देवादेव तूं सोपा । तुझी झालिया कृपा । नमन बापा तुझ्या चरणीं ।। ५५ ।। नमो नमो तारका । तूं ब्रम्ह नाम निशेखा । नमो तुजवांचोनी सखा । योगियासी पैं नाहीं ।। ५६ ।। युगादि युगत्रय । युग जोग योगमय । हे तुज पासाव होय । ऐसिया नमो ।। ५७ ।। नमो नमो नम । नाहीं नाहीं

तुजसी सम । ऐसा परा पश्यंती नेम । वदलिया चारी ॥ ५८ ॥ चहूं मुक्ती परतत्वा । पंचमु जो बद्धसत्वा । षड्मार्ग गुणसत्वा । ग्रास न करिसी तुज नमो ॥ ५९ ॥ चिद्गद चिद्विलासा । भानुबिबा प्रतिप्रकाशा । नमो तेजतेजसा । आदि सूर्या ॥ ६० ॥ ऐसा चहूं ग्रथींचा क्लेशू । वाउगाची वाहे सोसू । तिमिर त्रिगुण असोसु । तो सत्वांशु तोडी माझा ॥ ६१ ॥ साही नाडी चक्रभ्रमें । वाहतां इंद्रियांचीं ग्रामें । आडखळोनी साउमे । नये एसें करी स्वामी ॥ ६२ ॥ बाद्धचबाधा कर्माची । सर्व सत्ता या भ्रमाची । नमनें करूनिया तुमचीं । तुह्मांसी अर्पिलीं स्वामी ॥ ६३ ॥ यमधर्माचिया सत्ता । कर्मधर्माचिया पंथा । कर्मधर्म तो विधाता । ऐशिया नेमिता तुज अर्पिला ॥ ६४ ॥ दमशम समान । इडा पिंगळा सुषुम्न । साही चक्रें दरुषण । तुझीं तुज अर्पिलीं ॥ ६५ ॥ मन पवन योगधारण । तूं याशीं पैं कारण । समतुकें अवघे गुण । तुझ्या चरणीं निरपेक्षिले ॥ ६६ ॥ हे भूतभौतिक प्रचंड । जन्मउत्पत्तीचें अंड । जन्मजुगादी ब्रह्मांड । खंडविखंड तूं जाणतां ॥ ६७ ॥ प्रचुरचर्या चित्ताची । धावन वळन आंकोचनाची । सुचना जे चमत्काराची । तेही अर्पण तुज सदां ॥ ६८ ॥ निर्वासना वासनायुक्त । फळें राहिलें जेथें चित्त । तेथें तूं धांवोनी अनंत । सोडविसी वासनामय ॥ ६९ ॥ सूक्ष्म अविचारा बोला । बोलेना तुडे व्यर्थ गेला । तो म्यां बुझावोनी संबोखिला । मग लाविला तुझ्या पंथीं ॥ ७० ॥ नित्य धर्माचिया वाळी । चळल्या वळल्या कोळ चाळी । त्यासी वेद तुझा पाळी । त्यां तूं सांभाळी परब्रह्मा ॥ ७१ ॥ श्रुतिस्मृतींचीं वचनें । त्याचीं आंगरींगमार्ग स्थानें । कीर्तनीं गुण वर्णनें । हेहि नारायणें अंगिकारावीं ॥ ७२ ॥ उदंड विदंड वितंड । देह द्वारा अभंड । जे जे दिसे भ्रंश अडांड । ते शुभ्रचंड सांभाळी ॥ ७३ ॥ देह मरणाची ममता । देह पाळिती जे सत्रा । त्याही वरील सूक्ष्मता तें कृपावंता सांभाळी ॥ ७४ ॥ तिमिर त्रिगुण अवघें ॥ जें जें आलें असेल वोघें । तें तें मी नेघे । तें तूं सकळ वेगें सांभाळी ॥ ७५ ॥ योनीचिया कष्टा । वरी–वासना होत्या भ्रष्टा । संसार हा कटकटा । रतलों तुझ्या चरणीं

॥ ७६ ॥ विद्यावय साकुळ । ब्रह्मकर्म आचारशील । गेले आले विव्हळ । ते तूं दयाळा सांभाळी ॥ ७७ ॥ नाना जन्म अवतार । नाना शाखांचे निर्धार । नाना गोत्र उच्चार । तुझा विचार तूं जाणसी ॥ ७८ ॥ पाठ वेदादि वचनें । शास्त्रदृष्टि अवलोकनें । कीर्तनीं गुण वर्णनें । हीहीं नारायणें अंगिकारावीं ॥ ७९ ॥ सर्वमय । करुनी चालिलों वाटा ॥ चंद्र सूर्य नक्षत्रें घनदाटा । करुनी एक वाट पायरी ॥ ८० ॥ सर्व अंडाचें ब्रम्हांड । मी न म्हणें अंडाअंड । खंडें करूनिया विखंड । प्रचंड मी तुजसी बोलें ॥ ८१ ॥ रोमरंध्रीं ब्रह्मांडें । सकळ विराटमय खंडें । ऐशीं महत् ब्रह्में प्रचंडें । तुझ्या अंगीं दातारा ॥ ८२ ॥ तूं विश्वरूपाची घडी । तारक ब्रम्हचि उघडी । मी या निजदृष्टीनें चोखडी । तुझी मूर्ति न्याहाळीली ॥८३॥ ते न सुटे निजकळें । येऱ्हवी हे नाकळे । तुझिया कृपागुजें आकळे । तुझिया दासा निजभक्ता ॥८४॥ अनंत या नामाचा संकेत । मन मुरालें जेथें निर्घुत । तूंपणें परमाद्भुत । परमानंदा ॥ ८५ ॥ गुणाग्र गोसावी राम । गुणसमुद्र गुणग्राम । सर्व भूतांचा विश्राम । तुज नमो ॥ ८६ ॥ नमन केलिया विभक्त चित्त रमले झाली विश्रांती । तुज देखिलिया श्रीपती । विझतसे चित्तीं तळमळ ॥ ८७ ॥ नमन हेंचि थोर दिसे । एरव्ही तरंगाकार भासे । दाखलें तितुकें नासें । नैश्वर्य ऐसी श्रुति बोले ॥ ८८ ॥ नमन हेंचि परम । नमन हें सुवर्म । नमन हेंचि आत्माराम । करूं निघाली ॥ ८९ ॥ नमन हाचि अनुभव । नमन हाचि मुख्यभाव । नमन हाचि पैं देव । देवाधिदेवं तूं पावसी ॥९०॥ नमन हेंचि श्रेष्ठपीठा । नेतसें तुझिया वाटा । तुज ऐसा श्रेष्ठा । मग वागा काय कराविया ॥९१॥ नमन हेंचि तारका । नमन हाचि विवेका । नमनेंवीण त्रैलोक्या । आडमार्गें रिघताती ॥ ९२ ॥ नमन लटिकें नव्हे नव्हे । नमन भलतियासी न साहे । जैसा साह्य सखा होये । श्रीनिवृत्ती ॥९३॥ नमना एवढा मंत्र । नाहीं नाहीं धुंडिता शास्त्र । विचारलक्षण पात्र । तेंचि जाणें येथीचें ॥ ९४ ॥ नमन करी ब्रम्हश्रेष्ठा ।

नाभिकमळीं धरी वैकुंठा । नमन करी नीळकंठा । तीर्थें मस्तकीं वंदिती ॥ ९५ ॥ इंद्र चंद्र महेंद्र थोर । नमनेंवीण नैश्वर । अंडामध्यें चराचर । नमनेंवीण न तरती ॥ ९६ ॥ श्रीगुरुकृपा जें होय । तें नमनाची ऐशी सोय । पाऊनि सुगम उपाय । नमो नमस्ते तुज ॥ ९७ ॥ नमस्ते नमस्ते नमस्ते । पुढती पुढती नमस्ते । समाधि सुख आस्ते । नमोनमः करिता ॥ ९८ ॥ नमो नमो आदिपीठा । शिवादि गुणवरिष्ठा । येथें येउनि वैकुंठा । समाधिशेज घातली ॥ ९॥ महाविष्णु तूं योगरूपा । महारूपाचिया स्वरूपा । महादित्या अमूपा । कोटिरुद्र तेजरा ॥१००॥ शंखचक्रानें मंडित । करकमळ तुझे मिरवत । पदक हृदयावरी शोभत । आणि श्रीवत्सलांछन ॥ १०१ ॥ अनंत बाहूंचा मेळ । तों तूं चतुर्भुज गोपाळ । मुकुट दिसत तेजाळ । कोटी सूर्याहुनी प्रभा ॥ १०२ ॥ पीतांबर माळ कंठीं । सर्वांगीं चंदनाची उटी । हिरे माणिकें कटितटीं । अनेक लीला फांकती ॥ १०३ ॥ क्षत्र घटिकांच्या वोळी । घणघणाट तया वेळीं । देउडा पाउली निश्चळी । वेणु वाजविसी सुस्वरें ॥ १०४ ॥ रुणु झुणु रुणु झुणु । ऐसा वाजविसी वेणू । सुंदर तूं शामतनू । अलंकापुरीं उभा असती ॥ १०५ ॥ सभोंवते गोपाळ तुझे । ते अंतरंग राखे माझे । पुंडरिक तरी सहजे । प्राणसखा पै माझा ॥ १०६ ॥ ऐसा ज्ञान उद्बोध बोले । ज्ञानाज्ञान निरसलें । विज्ञानही हारविलें । दृश्यदृष्टेपणेंसीं ॥ १०७ ॥ बापरखुमादेवीवरु । समाधि देऊनिया स्थिरू । वरी ठेऊनिया अभयकरू । वर देउनी राहिला ॥ १०८ ॥

श्री ज्ञानदेवांनीं आपल्या समाधीस १०८ प्रदक्षिणा घालत असतांनाच या १०८ ओव्या म्हटल्या.

त्यानंतर श्री ज्ञानदेवांचें शेवटचें दर्शन सर्वांनीं घेतलें. श्रीगुरु निवृत्तिनाथ आणि आराध्यदैवत श्री. रुक्मिणी पांडुरंग यांची शेवटची पदधूलि ज्ञानदेवांनीं मस्तकीं धारण केली. नामदेवपुत्र नारा-विठा यांनीं समाधिस्थान तुलसीदलबिल्वपत्रें यांनीं सज्ज केलेलें होतेंच. ज्ञानदेवांचा एक हात निवृत्तीनाथ व दुसरा हात प्रत्यक्ष श्रीपांडुरंग यांनीं हातांत धरून त्यांना समाधिस्थानीं नेलें.

तेथें त्यांच्यापुढें श्री ज्ञानेश्वरी ठेवलीच होती. समाधिशय्येवर बसतांच श्री ज्ञानदेवांनीं उभयतानांही तीन वेळां हात जोडून व मस्तक नमवून नमस्कार केले. त्यांचे शेवटचे उद्‌गार खालीलप्रमाणें निघालें.

१००८ ज्ञानदेव म्हणे सुखी । केले देवा ।।
पादपद्मीं ठेवा । निरंतर ।। १ ।।

यानंतर लगेच नेत्र मिटले. निवृत्तिनाथांनी समाधिस्थानाबाहेर येऊन वरून शिलाखंडानें तें स्थान शेवटचें बंद केलें. ज्ञानेश्वरमाऊलींचा शेवटचा जयजयकार करून ती सर्व संत मंडळीं आचमनासाठीं इंद्रायणी तीरीं उतरलीं.

**श्री ज्ञानदेव गाथा समाप्त.**

---

# श्री ज्ञानदेवाची आरती

आरती ज्ञानराजा । महा कैवल्य तेजा ।। सेविती साधूसंत । मनु वेधिला माझा ।। ध्रु० ।। लोपलें ज्ञान जगीं । हित नेणती कोणी ।। अवतार पांडुरंग । नांव ठेविलें ज्ञानी ।। १ ।। आरती०।। कनकाचें ताट करीं । उभ्या गोपिका नारी ।। नारद तुंबरु हो । साम गायन करी ।। २ ।। आरती ।। प्रगट गुह्यबोले । विश्व ब्रम्हचि केलें ।। रामा जनार्दनीं । पायीं टकची ठेले ।।३।। आरती ।।

# भाग ४ था.

## श्री निवृत्तीनाथ यांचे अभंग

१ आदीची अनादी मूळ पैं सर्वथा । पराविया कथा हारपती ।। १ ।। तें अव्यक्तरूप देवकीचें बाळ । वसुदेवकुळ कृष्णठसा ।। २ ।। मुरलीं ब्रह्मांडें अमितें पैं अंडें । ढिसाळ प्रचंडें जया अंगीं ।। ३ ।। निवृत्तीचें धन माजीं तो श्रीकृष्ण । सांगितला प्रश्न गयनीराजें ।।४।।

२ बिबीं बिब येक बिबलें सम्यक् । आपण तिन्ही लोक एक्या रूपें ।। १ ।। तो कृष्णरूपठसा गोपाळां लाधला । सर्वत्र देखिला चतुर्भुज ।। २ ।। नि्ळिमा अंबरीं नीळवर्ण तेज । गोपाळ सहज बिंबाकार ।। ३ ।। निवृत्तिपरिपाठ नीळवर्ण खरा । नंदाचिया घरा कृष्ण आले ।।४।।

३ कामना कामीक वासना तार्किक । रजतमसात्विक येक्या रूपें ।। १ ।। तें हें कृष्णमयें कृष्णनाम खेळे । भक्तिभावबळें पोषीतसे ।। २ ।। नित्य तें अनित्य आपणचि सत्य । कार्याकारणकृत्य हरपे जेथें ।। ३ ।। निवृत्तीचें ध्यान धारणाविवर । सर्वरूपें घर वैकुंठ माझें ।। ४ ।।

४ मीरूप कळलें तूंपण सांडिलें । कल्पनें तोडिलें मुळींहुनी ।।१।। मूळ तें नुगवे फळ तें निमालें । हरि हें घेतलें जीवनहेतु ।। २ ।। जाला पैं सरता हरिनामपाठें । नेतसे वैकुंठें गुरुकृपा ।।३।। निवृत्ति गयनीनाम नारायणीं । अखंडता ध्यानीं रामनाम ।।४।।

५ सनकसनंदन भक्त अंतरंग । हरिरूपें सांग पूर्ण झाले ।। १ ।। तेथील उद्बोध उग्दारु पारुषे । सर्व हाचि दिसे हरि आम्हां ।। २ ।। निवृत्तिसंग सुलभ श्रीरंग । टाकिला उद्वेग कल्पनेचा ।।३।।

६ बुद्धिबोध नाहीं क्षमारूप सर्व । तेथें देहभाव अर्पियेला ।।१।। नाहीं काळवेळ नाहीं तो नियम । सर्व यमनेम बुडोनि ठेले ।। २ ।।

हरिरूप सर्व गयनीप्रसादें । सर्व हा गोविंद आम्हां दिसे ॥ ३ ॥ निवृत्तिस फळ गयनी वोळला । सर्व हा गोविंद आम्हां दिसे ॥४॥ निवृत्ति सफळ गयनी वोळला । सर्व काळ जाहला हरिरूप ॥ ५ ॥

७ गयनीगव्हर कृपेचा उद्गार । वरुषला उदार अमृतमय ॥१॥ तोचि ओघ साचा मुक्ताईसि लाटा । चालिलों वैकुंठा समारंभें ॥ २ ॥ कुंचे गरुडटके टाळ श्रुति हरि । चालिलों गजरीं हरिसंगें ॥ ३ ॥ निवृत्ति वैष्णव सोपान खेचर । करिताती गजर हरिनामें ॥ ४ ॥

८ जेथुनी हे परा पश्यंती ओवरा । मध्यमा निर्धारा वैखरी वाहे ॥१॥ तें रूप सुंदर नाम ते श्रीधर । जेणें चराचर रचियेलें ॥ २ ॥ वेदाचें जन्मस्थान वेदरूप आपण । तो हा नारायण नंदाघरीं ॥३॥ निवृत्तिदैवत पूर्ण मनोरथ । गोपिकांचें हित हरि माझा ॥ ४ ॥

९ भावयुक्त भजतां हरि पावे पूर्णता । तो गोकुळीं खेळतां देखों हरी ॥ १ ॥ मुक्तीचें मा जिवडें ब्रह्म चहूंकडे । गौळणी वाडेंकोडें खेळविती ॥ २ ॥ न संपडे ध्यानी मनीं योगियां चिंतनीं । तो गोकुळींचें लोणी हरि खाये ॥ ३ ॥ निवृत्तिजीवन गयनीनिरूपण । तो हा नारायण गोकुळीं वसे ॥४॥

१० सत्यभामा माये अन्नपूर्णा होये । वेळोवेळां सूर्ये कवळु मुखीं ॥१॥ राही रखुमाई आदिमाता मोहें । नामा तो उपाये बुझाविती ॥ २ ॥ घरे नाम्या ग्रास ब्रह्मींचा गळाला । आवडसी गोपाळीं प्रीतिहुनी ॥३॥ कुर्वाळितो हरि नुघडी तो दृष्टी । सप्रेमाचा पोटीं अधिक होसी ॥४॥ धरुनि हनुवटी पाहे कृपादृष्टी । आनंदाचे सृष्टी माजीं नामा ॥ ५ ॥ निवृत्ति ज्ञानदेव सोपान चांगा हरि । यांसि परोपरी कवळु देतु ॥ ६ ॥

११ नुघडितां दृष्टि न बोले तो वाचा । हरिरूपीं साचा तल्लीनता ॥ १ ॥ उठि उठि रे नाम्या चाल रे सांगातें । माझे आवडते जीवलगे ॥ २ ॥ कुरवाळिला करें पुसतुसे गूज । घेई ब्रह्मबीज

सदोदीत ।। ३ ।। ज्ञानासी लाधलें निवृत्ति फावलें । सोपाना घडलें दिनकाळ ।।४।। तें हें रे सखया खेचरासि पुसे । गुरुनामीं विश्वासे ब्रह्मरूपें ।।५।। निवृत्ति म्हणे आतां अनाथा श्रीहरि । तूंचि चराचरीं हेचि खूण ।। ६ ।।

१२ नुघडूनियां दृष्टि नामा पाहे पोटीं । आनंदाची सृष्टि तया जाली ।। १ ।। घे रे नाम्या कवळु आनंदाचा होसी । तुजमाजीं निवासि हरि आहे ।।२।। नामा पसरी मुख आनंदला तृप्त । केवळ पूर्ण भरित हरिराज ।। ३ ।। निवृत्तीनें सेविला कवळु हा हरि । तूंचि चराचरीं दिससी आम्हां ।।४।।

१३ तंतवितंत त्यामाजीं मथित । नाद उमटत स्वानंपाचा ।। १ ।। सोहंबीजतत्त्वं गुरनाममंत्र । ज्ञानी उपासित हरिराज ।।२।। भेदूनि कुंडलणी गोल्हाट निकट । आत्मारामपेंठ पांडुरंग ।। ३ ।। निवृत्ति म्हणे मी सर्वस्व होईन । हरि हा भरीन पूर्ण देहीं ।। ४ ।।

१४ आगम आणि निगम सर्व सर्वोत्तम । दिननिशीं राम सेवीतुसे ।। १ ।। आतमा गोड हरि आम्हां चाड धरी । अरिते संहारितो आम्हां माजीं ।। २ ।। नेघों हरीविण वुजें तें पैं भिन्न । सांगितली खूण गुरुराजें ।। ३ ।। निवृत्ति गयनीप्रसाद उन्मनीं । निरंतर ध्यानीं रामनाम ।।४।।

१५ भक्तीचें महिमान भक्तांसी फळलें । दिनकाळ केलें ब्रह्मार्पण ।।१।। ब्रह्मार्पण राम संतोषरूप जाला । ब्रह्मचि रूप केला आपण्याऐसा ।। २ ।। सर्व ब्रह्म राम वेदादिक शब्द । आपण गोविंद सर्वांघटीं ।।३।। निवृत्तीनें ब्रह्म देखिलें परिपूर्ण । माजीं सनातन ब्रह्म सुखें ।।४।।

१६ सर्व हरि ब्रह्म वेदादिक मती । श्रुतीही बोलती तेणें पंथें ।।१।। ब्रह्मामाजीं जयो ब्रह्मांड उदयो । ब्रह्म हें स्वयमेवो आत्माराम ।। २ ।। शास्त्रें समवाय उपनिषदें गोमती । चैतन्याची श्रुती ब्रह्ममय ।। ३ ।। निवृत्ति निरोपण सर्व नारायण । हरिविण दिन रिता नाहीं ।। ४ ।।

१७ श्रुतिशास्त्रवेद यांसी नाहीं भेद। भेदवादी द्वंद्व वेगळें पडे ॥ १ ॥ वेगळा भावितां वेगळाचि होये। ब्रह्मासी न साहे तेथिचा मळ ॥ २ ॥ मळेंसि वोविळा राहाटीं गोंविला। तो कैसा खुंटला बोलों आम्हीं ॥ ३ ॥ निवृत्तिसाधन न करा हा विश्वास। गुरुविण पाश न तुटती ॥ ४ ॥

१८ ध्येयध्याताध्यान ज्ञेयज्ञाताज्ञान। दृश्यद्रष्टा भान हरपती ॥ १ ॥ पूज्य ते पूजक पूजन स्वभाव। अंतीं ब्रह्म एव ब्रह्मामाजीं ॥२॥ तेचि हे धारणा तर्क सर्व पूर्णा। विवेक ही खूण सहजस्थिति ॥ ३ ॥ निवृत्तिधारणा ब्रह्म सनातना। नित्य नारायणा चिंती सुखें ॥ ४ ॥

१९ गगनीच्या गगनीं तेजपूर्ण धरणी। आपणचि तरणी जगा यया ॥१॥ ब्रह्म माजीवडे गोपाळ संगती। वेद वाखाणिती ज्याची महिमा ॥ २ ॥ लोपती त्या तारा हारपे दिनमणी। तो खेळे चक्रपाणी गोपाळामाजीं ॥ ३ ॥ निवृत्तिनिधान श्रीरंग खेळतु। गोपिकांसी मातु हळुहळु ॥ ४ ॥

२० गगन घोटींत उठी पृथ्वी सगळी। दाटी आपणचि पाठी कूर्म जाला ॥ १ ॥ कांसवीतुषार अमृत सधर। भक्त पारावार तारियेले ॥ २ ॥ उचलिती ढिसाळ सर्व हा गोपाळ। तो यशोदेचा बाळ नंदाघरीं ॥ ३ ॥ निवृत्ति सादर हरिरूप श्रीधर। आपण चराचर विस्तारला ॥ ४ ॥

२१ निरालंबबीज प्रगटे सहज। तो गौळियांचें काज करी कृष्ण ॥ १ ॥ हरि हा सांवळा वेधिलिया बाळा। माजीं त्या गोपाळा गायी चारी ॥२॥ वंदिती सुरवरगण ब्रह्मादिक शरण। तो यशोदेसी स्तन मागे हरि ॥३॥ निवृत्ति ध्यान मनाचें उन्मन। योगियां जीवन हरि माझा ॥४॥

२२ वैकुंठदैवत देवां मुगुटमणी। ऐकिजे पुराणीं कीर्ति ज्याची ॥१॥ तो हरि बाळके गोपिकां कौतुक। गोपाळ सकळिक संवगडे ॥ २ ॥ आदि शिवा जप जपतु अमुप। तें प्रत्यक्ष स्वरूप नंदाघरीं

॥३॥ निवृत्तिसमाधि उगवली सकळिकां। तारी तिन्ही लोकां एका-नामें ॥ ४ ॥

२३ ब्रह्मांड उतरंडी ज्याचें इच्छे घडी। उच्छिष्टें काढी धर्माघरीं ॥ १ ॥ देखिला वो माये चक्रभुज स्वभावीं। वारु ते वागवी अर्जुनाचे ॥ २ ॥ याज्ञिक अर्पिती मंत्राच्या आहुती। द्रौपदियेप्रति भाजी मागे ॥ ३ ॥ निवृत्तिदैवत पूर्ण मनोरथ। पांडव कृतार्थ कृष्णनामें ॥४॥

२४ ब्रह्मादिक पूजा इच्छिती सहजा। तो गौळियांच्या काजा तिष्ठतुसे ॥ १ ॥ देखिलें सांवळें पूजिती गोंवळें। नंदाघरीं खेळे स्वामी माझा ॥ २ ॥ निवृत्तिदैवत पूर्ण मनोरथ। योगिये चिंतित हृदयीं जया ॥३॥

२५ वेदबीज साचें संमत श्रुतीचें। गुह्य या शास्त्रांचें हरि माझा ॥ १ ॥ तो हरि खेळतु प्रत्यक्ष मूर्तिमंतु। दुष्टां मुक्ति देतु जीवघातें ॥ २ ॥ अर्जुना साह्याकारी द्रौपदी कैवारी। तो विदुराचे घरीं अन्न मागे ॥ ३ ॥ निवृत्तीचें धन गोकुळीं श्रीकृष्ण। यादव सहिष्ण हरि माझा ॥४॥

२६ देवा मुकुटमणी ऐकिजे पुराणीं। तो हा चक्रपाणी नंदाघरीं ॥ १ ॥ नंदनंदन हरि गौळणी गोरस। गोकुळीं हृषीकेश खेळतुसे ॥२॥ हरि हा सुकुमार भौमासुर पैजा। बोळलासे द्विजा धर्माघरीं ॥ ३ ॥ निवृत्ति रोकडें नाम फाडोवाडें। हरिरूप चहूंकडे दिसे आम्हां ॥४॥

२७ योगियांचें धन तें ब्रह्मसंपन्न। तो हा जनार्दन नंदाघरीं ॥ १ ॥ हरिरूप माये सर्वांघटीं आहे। दूधलोणी खाये गौळियांचें ॥ २ ॥ चिंती अजमेळ नाम आलें मुखा। तो वैकुंठींच्या सुखा देतु हरि ॥ ३ ॥ निवृत्तीचें धन जगाचें जीवन। नाम नारायण तरणोपाव ॥ ४ ॥

२८ जेथूनि उद्गारु प्रसवे ॐकारु। तोचि हा श्रीधरु गोकुळीं वसे ॥ १ ॥ जनकु हा जगाचा जीवलगु साचा। तो हरि आमुचा

नंदाघरीं ॥२॥ न माये वैकुंठीं योगियांचे भेटी । पाहतां ज्ञानदृष्टीं नये हाता ॥३॥ निवृत्ति म्हणे देवा म्हणविताहे राव्रो । तो सुखानुभवो यादवांसी ॥४॥

२९ नाहीं हा आकार नाहीं तो विकार । चतुर्भुजधर हरि माझा ॥ १ ॥ हरिरूपजप हरिहररूप । गोळियांचें तप सहज कृष्ण ॥२॥ हरिरूप घरीं सोळा सहस्र नारी । तो बाळ ब्रह्मचारी गायी राखे ॥ ३ ॥ निवृत्ति रोकडें । ब्रह्म माजिवडें । तो यशोदेचे पुढें लोणी मागे ॥ ४ ॥

३० नाहीं यासी गोत नाहीं कुळ । शेखीं आचारशीळ कोण म्हणे ॥ १ ॥ बाळरूपें हरि गोकुळीं लोणी चोरी । त्या यशोदा पाचारी स्तन द्यावया ॥ २ ॥ सोंवळा हरि वागवी सिदोरी । गोपाळांच्या करीं काला देतु ॥ ३ ॥ निवृत्ति संपूर्ण कवळु देतु आण । ब्रह्म सनातन गोकुळींचें ॥४॥

३१ न साहे दुजेपण आपण आत्मखूण । श्रुतीही संपूर्ण हारपती ॥१॥ वेदरूप श्रीकृष्ण योगियां जीवन । तें रूप परिपूर्ण आत्माराम ॥ २ ॥ न दिसे वैकुंठीं योगियां ध्यानबीज । तो गोपाळांचें काज करी हरि ॥ ३ ॥ निवृत्ति गयनी हरी उच्चारीत । माजीं करी मनोरथ कामसिद्धि ॥४॥

३२ हें व्यापूनि निराळा भोगि वैकुंठसोहळा । नंदाघरीं गोपाळा हरि माझा ॥ १ ॥ न साहे सगुण अवघाचि निर्गुण । तो कृष्ण आपण गोपाळवेषें ॥२॥ गायी चारी हरि खांद्यावरी । वेणु नानापरि वातु असे ॥ ३ ॥ निवृत्ति गयनी कृपा जपतो अमुप जाण । सांगितली खूण गोरक्षानें ॥ ४ ॥

३३ दिसें वरिवरि नाम अवघें वैकुंठधाम । जपतो शिव वर्म रामनामें ॥१॥ तें रूप समरस गोकुळीं हृषीकेश । नंदाघरीं गोपवेषें हरि खेळे ॥२॥ समाधिधनधाम वैकुंठ हरिसम । योगियां पूर्णकाम हृदयीं सदा ॥ ३ ॥ निवृत्तीनें कथिलें गुरु गयनीप्रसादें । सकळ हा गोविंद आत्माराम ॥४॥

३४ सर्वस्वरूपें नाम सर्वघटीं घनश्याम । तो गोकुळीं आत्माराम दूध मागे ॥ १ ॥ भाग्येंविण दुभतें दैव उभडतें । नंदाघरीं आवडतें हरि खेळे ॥ २ ॥ मंजुळ वेणुवाद्यें लुब्धल्या धेनुवा । नंदाघरीं दुवा हा पूर्ण वाहे ॥३॥ घरोघरीं दुभतें गौळियां परिपूर्ण । यशोदा तें आपण गोरस घुसळी ॥ ४ ॥ गो गोपाळ हरिखु नंदा यशोदा देख । गौळियां कौतुक करिती हरि ॥५॥ निवृत्ति गयनी देव उपदेशिला सर्व । गोरक्षीं गुह्यभाव सांगती मज ॥६॥

३५ गोकुळीं वैकुंठ वसे गोपाळामाजीं । सौरसें अमक्त न दिसे काय करूं ॥१॥ पूर्वपुण्य चोखडें ब्रह्मांडकोडें । तें यशोदेकडे शोभे कैसें ॥२॥ वसुदेव अमुप देवकीये समीप । वैकुंठींचे दीप लाडेंकोडें ॥ ३ ॥ उग्रसेन संप्रधार केला राज्यधर । यादवपरिवार रामकृष्ण ॥ ४ ॥ द्वारकानाथ हरि सोळा सहस्र नारी । बळिराम परिवारी हरि माझा ॥५॥ निवृत्तिजीवन ध्यान एक रामकृष्ण । उच्चारणीं कोटि यज्ञ होती नामें ॥६॥

३६ भाग्येंविण नसें जना भाव नसें । तेथें सर्व दिसें हरि माझा ॥१॥ फळलें अमूप कृष्णनामरूप । उच्चारितां खेप हरे जनां ॥२॥ नंद ते यशोदा देवकी मुकुंदा । वसुदेव सदां भाग्यनिधी ॥ ३ ॥ निवृत्ति संपूर्ण गुरुमुखें खूण । भाग्येंविण जाण नये मुखा ॥४॥

३७ रूप हें सांवळें भोगितां डोळे । उद्धवा सोहळे अक्रूरासी ॥ १ ॥ पद रज वंदी ध्यान हें गोविंदीं । उद्धव मुकुंदीं तल्लीनता ॥२॥ विदुर सुखाचा नाम जपे वाचा । श्रीकृष्ण तयाचा अंगीकारी ॥३॥ निवृत्तीचें ध्यान ज्ञानदेव खूण । सोपान आपण नामपाठें ॥१॥

३८ वैकुंठ दुभतें नंदाघरीं माये । तें पूर्ण पान्हा ये यशोदेसीं ॥१॥ तें रूप रूपस कांसवी प्रकाश । योगिजनमानस निवताती ॥ २ ॥ सुंदर सुनीळ राजस गोपाळ । भक्तीसी दयाळ एकया नामें ॥३॥ निवृत्ति गयनी मन तें चरणीं । अखंडता ध्यानीं तल्लीनता ॥ ४ ॥

३९ ब्रह्मांड करी हरि ब्रह्म झाडा करी । ते नंदयशोदेघरीं खेळतुसे ।। १ ।। त्रैलोक्यदुर्लभ ब्रह्मादिकां सुलभ । रुक्मिणीवल्लभ कृष्ण सांवळा ।।२।। हिरण्याक्ष वधूनि दाढे धरी मेदिनी । तो हा चक्रपाणी यशोदेचा ।। ३ ।। रामावतारु गाढा दशशिरारगडा । रिठासुरदाढा तेणें पाडें ।।४।। चतुर्भुज श्रीपति सुकुमार साजती । शंखचक्रांकिती हरि माझा ।। ५ ।। निवृत्ति ध्यानशूर सर्वरूपें श्रीधर । जिंकिला मौमासुर रणयुद्धीं ।। ६ ।।

४० कल्पनामासोळी भवजाळ जाळी । पाशाचिये जाळीं गुंतताहे ।।१।। मायाजाळ गोंवी भवसिंधु दावी । मन हें माधवी गोंवी जना ।।२।। विषयाचें पोखणें पहा तेथें शून्य । क्षणीं हें तूं मन जाऊं देसी ।।३।। निवृत्तिसाधन मन हें अनावर । गुरुचरणीं थार बिढार धरी ।। ४ ।।

४१ भवार्णव हेतु काय सांगूं मातु । कल्पना हे तंतु छेदीयेला ।। १ ।। नाहीं आम्हां ठावो नाहीं आम्हां ठांवो । वासना संदेहो बुझालासे ।। २ ।। नामाचें सुमन वाचें नारायण । जनीं जनार्दन ययाहेतु ।। ३ ।। निवृत्तिनिरोपण ब्रह्म हें साधन । गुरुकृपाखूण हिता आली ।।४।।

४२ भवसागरसार तरणोपाव सोपा । कृष्णनाम खेपा हरित्ती जना ।। १ ।। रामकृष्णमंत्र जनासी उद्धार । आणिक साचार मार्ग नाहीं ।। २ ।। निष्काम कल्पना आधीं साधी मना । ऐक्यसमीरणा हेंचि करी ।। ३ ।। निवृत्तिधारणा गुरुचरणखुणा । ब्रह्मांड या खुणा गुरुकृपा ।। ४ ।।

४३ प्रकृतीचा पैठा कल्पनामाजिठा । नपवे तो वैकुंठा कर्मजाड्य ।। १ ।। अहिंसेचें स्वरूप हेंचि हरिरूप । न म्हणे हरि आप सर्व आहे ।। २ ।। नाहीं त्यासी जय नुद्धरे सर्वथा । हरिविण व्यथा कोण वारी ।। ३ ।। निवृत्ति म्हणे धरी गुरुचरणसोये । तेणें मार्गें पाहे हरि सोपा ।। ४ ।।

४४ जेथें पाहे तेथें व्यापिलें अनंतें । तयाविण रितें कोण ठाय ।। १ ।। गगनेंवीण ठावो नाहीं जैसा रिता । तैसा या अच्युताविणें कांहीं ।। २ ।। तेथें माझ्या चित्ता करी रहिवासु । न नकरी उदासु ऐसीयातें ।।३।। निवृत्तीनें मन ठेविलें चरणीं । नामाची निशाणी अखंडित ।। ४ ।।

४५ कांसवीचीं पिलीं करुणा जरी भाकी । परी सांपडली निकी चरणसोय ।।१।। कामधेनु घरीं हरि माझा गोपाळ । मज काळवेळ नाठवे तैसी ।। २ ।। चातकाची चिंता जरी नपवे जीवन । तरीच शोकें प्राण तृषाहेतु ।।३।। निवृत्ति स्वानंदु कामधेनु गुरु । नामाचा उच्चारु तेणें छंदें ।।४।।

४६ करुणाकल्लोळणी अमृताची खोटी । भरलीसे सृष्टि हरिच्या नामें ।। १ ।। सर्व हरि आतमा वेद बोले सीमा । हरि परब्रह्म रामकृष्ण ।। २ ।। हरिविण ठावो न दिसे सर्वत्र । हरिविण परत्र नाहीं नाहीं ।। ३ ।। निवृत्तीचें घर गयनी साचार । त्यामाजीं उच्चार हरि आम्हां ।।४।।

४७ शून्य साकार घटीं जीवशिव काष्टीं । मीपणासी तुटी एक्या नामें ।।१।। तें हें नाम सोपें रामकृष्णमाळा । यासी काळवेळा नाहीं नाहीं ।। २ ।। शून्य हें ही ठाय जीव जाये जिवीं । मन हें माधवीं हरपत ।। ३ ।। निवृत्ति निमग्न शून्याकार घट । गुरुनामें मठ तेथें केला ।।४।।

४८ अनंत ब्रम्हांडें अनंत रचना । शून्य हे वासना तेथें जाली ।।१।। मन गेलें शून्यीं ध्यान तें उन्मनीं । चित्त नारायणीं दृढ माझें ।। २ ।। तेथें नाहीं ठावो वेदांसी आश्रयो । लोपले चंद्र सूर्य नाहीं सृष्टीं ।। ३ ।। निवृत्ति म्हणे तो ठाव मज पैठा । नेतसे वैकुंठा गुरु माझा ।।४।।

४९ शून्य तें पूशिलें निरशून्य बिंबलें । ब्रम्ह उगवलें तेजाकार ।।१।। काळासी करिते वासना आकळीते । दिनकाळ हरीतें सेवीतसे

॥२॥ माजिटा श्रीहरि दिसे परोपरी । घटमठसरी एकु शोभे ॥३॥ निवृत्ति दाटुगे गुरुमुखें कळलें । सर्वत्र गोपाळें केलें मज ॥४॥

५० ध्यान ना उन्मनी दृढ ना बंधन । सर्वी सर्वपूर्ण हरि एकु ॥ १ ॥ वेदाचा वेदकु शास्त्रांचा विवेकु । श्रुती परलोकु हरि माझा ॥ २ ॥ उगवलें क्षेत्र पिकतें घोळत । तैसें हें अनंत रूप दिसे ॥ ३ ॥ निवृत्ति चोखाळ गयनीप्रसाद । श्रीरंग गोविंद दिधला मज ॥४॥

५१ पूर्वीलिये क्षेत्रीं पूर्वज पुरता । तरिच अरुता हरि दिसे ॥ १ ॥ सर्व भावीं नाम वोळलें सर्वदा । अखंड गोविंदा गाऊं गीतीं ॥ २ ॥ शामतनु हरि प्रभा दिसे भानु । तो माझा जीवनु हरि आत्मा ॥ ३ ॥ निवृत्ति आवडे सद्‌गुरु गयनी । चित्त नारायणीं तल्लीनता ॥४॥

५२ पीतांबर दीपडें दीपकळिका शाम । शिव आत्माराम प्रेमतनु ॥ १ ॥ ब्रम्हांड धवळलें दिसे दशदिशा । ब्रम्हचि सहसा ब्रम्हपणें ॥ २ ॥ न दिसे भानमान दृश्याचा अनुमान । आपणचि पूर्ण तदाकार ॥ ३ ॥ निवृत्ति निर्विकार मनोमय सार । सर्व हा आचार ब्रम्हरूप ॥४॥

५३ गगनग्रास घोंटी ब्रम्हांड हें पोटीं । चैतन्याची सृष्टि आपण हरि ॥ १ ॥ देखिला गे माये सुंदर जगजेठी । नंदयशोदे दृष्टीं ब्रम्ह खेळे ॥ २ ॥ आकाश सौरस तत्त्व समरस । तो हा हृषीकेश गोपीसंगें ॥ ३ ॥ निवृत्तिसाधन निरालंबीं ध्यान । तोचि हा श्रीकृष्ण ध्यान माझें ॥४॥

५४ चतुराननघन तनंत उपजती । देवोदेवी किती तयांमाजीं ॥१॥ तेंचि हें सांवळें अंकुरलें ब्रम्ह । गोपसंगें सम वर्ते रया ॥२॥ निगम नाठवे वेदाचा द्योतकु । तो चतुर्भुज देखु नंदाघरीं ॥३॥ निवृत्ति म्हणे शंखचक्रांकित मूर्ति । आपण श्रीपति क्रीडतसे ॥४॥

५५ चिंतितां साधक मनासी नाकळे । तो पिकांसी आकळे करितां ध्यान ॥ १ ॥ देखिला गे माये सगुणा गुणनिधी । यशोदा-

गोविंदीं प्रेमपान्हा ॥ २ ॥ न माये सर्वांघटीं आपणचि सृष्टी । तो यमुनेच्या तटीं गायी चारी ॥ ३ ॥ निवृत्तिसाधन कृष्णाचें रूपडें । ब्रम्हांडा एवढें तदाकार ॥४॥

५६ निजलक्षाचें लक्ष हरपलें भान । दिनमान शून्य जयारूपीं ॥ १ ॥ तें ब्रम्ह गोजिरें गोपाळसंगती । संवगडे सांगाती भाग्यवंत ॥२॥ वेणुवाद्यध्वनि यमुनाजळ स्थिर । ध्यानाचा प्रकार कृष्णनामीं ॥ ३ ॥ निवृत्ति म्हणे तें स्वरूपसौख्य रूपडें । पाहाती चहूंकडे योगीजन ॥४॥

५७ अनंतरूप देवें अनंत आपण । अंतर्बाह्य खूण योगियासी ॥१॥ तो हा हरि माये गोकुळीं अवतार । गोपीसंगें श्रीधर खेळतुसे ॥२॥ शास्त्रांसी नाकळे श्रुति ती बरळे । तें गोपवेषें खेळे गोपाळां-माजी ॥ ३ ॥ निवृत्तीचें सार गयनीविचार । ब्रम्ह चराचर माजीं वसे ॥ ४ ॥

५८ ज्या रूपाकारणें देव वोळंगणें । योगी गुरुखुणें सेवितातीं ॥ १ ॥ तें रूप गोकुळीं गोपाळांचे मेळीं । अखंड समेळीं खेळतुसे ॥ २ ॥ ब्रम्हांड कडोविकडी ब्रम्हांडघडी । या योगपरवडी हरपती ॥ ३ ॥ निवृत्तीचें धन ब्रम्ह हें रोकडें । गौळणी त्या पुढें खेळविती ॥ ४ ॥

५९ जेथें नरिघे ठाव लक्षितां लक्षण । सूर्यतारांगण हरपती ॥१॥ तें रूप रूपस कृष्णब्रम्हनाम । गौळियां सप्रेम वोळलेंसे ॥२॥ जेथें लयलक्ष हरपो नसोये । द्वैत तें न साहे सोहंबुद्धि ॥३॥ निवृत्ति मान्यता सेवितु साकार । आपण तदाकार गोपवेषें

६० मीपणें सगळा वेदु हरपला । शास्त्रांचा खुंटला अनुवाद ॥१॥ तें रूप सुंदर कृष्णनाम सोपार । निरालंब गोचर गोकुळींचें ॥ २ ॥ सेवितां योगियां सुलभ दुर्गम । गौळियां सुगम नाम घेतां ॥३॥ निवृत्तिनिकट कृष्णनामसार । पापाचा संचार नामछेदें ॥४॥

६१ ध्यानाची धारणा उन्मनीचें बीज । लक्षितां सहज नये हातां ॥१॥ तें हें कृष्णनाम सखे नंदाघरीं । गोळिया माझारीं ब्रम्ह खेळे ॥२॥ न दिसे पाहतां शेषांदिकां गति । यशोदे श्रीपति बाळ जाला ॥ ३ ॥ गुंतलों मायाजाळीं अनंतरचनें । तो चतुरानना खुणें न संपडे ॥ ४ ॥ नकळे हा निर्धारु तो देवकी हो देवी । शेखी तो अनुभवीं भुलविला ॥ ५ ॥ निवृत्तिरचना कृष्णनामें सार । नंदाचें बिढार ब्रम्ह जालें ॥६॥

६२ हा पुरुष कीं नारी नव्हे तो रूपस । शेखी जगदीश जगद्रूपें ॥१॥ तें हें कृष्णरूप यशोदेकडीये । नंदाघरीं होये बाळरूप ॥२॥ ज्यातें नेणें वेद नेणती त्या श्रुती । त्या गोपिका भोगिती कामरूपें ॥३॥ निवृत्तीचें ब्रम्ह कृष्णनामें खेळे । असंख्य गोंवळे ब्रह्मरूप ॥४॥

६३ जेथें नाहीं वेदु नाहीं पैं शाखा । द्वैताचा हा लेखा हारपल ॥ १ ॥ तें रूप वोळलें नंदायशोदेसार । वसुदेवबिढार भाग्ययोगें ॥२॥ न मायेपुरता ब्रम्हांड उभवणी । त्यालागीं गौळणी खेळविती ॥३॥ निवृत्ति ब्रम्हरस सेवितुसे सोपें । नामें पुण्यपापें हारपती ॥४॥

६४ आगमनिगमां बोलतां वैखरी । तो यशोदेच्या करीं धरूनि चाले ॥ १ ॥ न संपडे शिवा बैसतांचि ध्यानीं । जालिया उन्मनी दृश्य नव्हे ॥ २ ॥ कमलासनीं ब्रम्हा ध्यानस्थ बैसला । पाहतां पाहतां मुळा न संपडे ॥ ३ ॥ निवृत्ति गयनी सांगतुसे खुणा । तो देवकीचा तान्हा बाळ जाला ॥४॥

६५ अष्टांगसाधनें साधिती पवन । ज्यासि योगीजन शिणताती ॥ १ ॥ तो हा कृष्ण गोपीगोपाळांमाझारी । क्रीडा नानापरी करी आत्मा ॥ २ ॥ अठरा साहीजणें बोलती परवडीं । तो माखणासी जोडी स्वयें कर ॥ ३ ॥ निवृत्तोचें ध्येय कृष्ण हाचि होय । गयनी-नाथें सोय दाखविली ॥४॥

६६ म्हणविती नंदाचा बाळ यशोदेचा । आपण चौवाचातीत कृष्ण ॥ १ ॥ शब्दांसी नातुडे बुद्धीसी सांकडें । तो सप्रेमें आतुडे

स्मरतां नाम ॥ २ ॥ उपचाराच्या कोटी न पाहे परवडी । तो प्रेमळाचीं घोडीं धोई अंगें ॥ ३ ॥ निवृत्तीचें तप फळलें अमुप । गयनीराजें दीप उजळिला ॥४॥

६७ अंधारिये रातीं उगवे हा गभस्ति । मालवेना दीप्ति गुरुकृपा ॥१॥ तो हा कृष्ण हरि गोकुळामाझारीं । हाचि चराचरीं प्रकाशला ॥२॥ आदिमध्यअंत तिन्ही जाले शून्य । तो कृष्ण निधान गोपवेशें ॥३॥ निवृत्तिनिकट कृष्णनामपाठ । आवडी वैकुंठ वसिन्नलें ॥४॥

६८ न जाणूं त्या कळाकुसरी गोपाळा । नाम हें मंगळ अच्युताचें ॥१॥ हेंचि मज द्यावें सप्रेम आपुलें । ध्यातुसे पाउलें एवढयासाठीं ॥२॥ न मागें नेघें कांहीं याविण आणिक । सप्रेमाची भूक तृष्णा करी ॥ ३ ॥ समर्थाचे घरीं कांहीं नाहीं उणें । अखंड प्रेम देणें कृष्णनामीं ॥ ४ ॥ इतुकेंचि दातारा पुरवि माझें कोड । याविण काबाड भार नेघें ॥ ५ ॥ निवृत्ति सप्रेम संजीवनी मूळ । स्मरतां काळ वेळ नाहीं नामीं ॥६॥

६९ परंपरा भक्त उद्धरिलें प्रेमें । सांडिलें दुर्गम सांसारिक ॥ १ ॥ नसतें भवभय होतें जें मानसीं । स्मरतां नाम त्यासी नाहीं केलें ॥ २ ॥ पाहतां तुझें नामरूप दृश्य नोहे । तो भक्तालागीं होय कृष्णठसा ॥ ३ ॥ निवृत्तीचें नाम रूप निराकार । कृष्ण हा साचार गयनीकृपा ॥४॥

७० आदिनाथ उमाबीज प्रकटिलें । मच्छिंद्रा लाधलें सहजस्थितीं ॥ १ ॥ तेंचि प्रेम समुद्रा गोरक्षीं दिधली । पूर्ण कृपा केली गयनीनाथा ॥२॥ वैराग्यें तापला सप्रेमें निवाला । ठेवा जो लाधला शांतिसुख ॥ ३ ॥ निर्द्वंद्व निःशंक विचरतां महीं । सुखानंद हृदयीं स्थिर जाला ॥४॥ विरक्तीचें पात्र अन्वयाचें मुख । देऊनि सम्यक अनन्यता ॥५॥ निवृत्ति गयनी कृपा केली असे पूर्ण । कुळ हें पावन कृष्णनामें ॥६॥

७१ आकारीं दिसे निराकारी वसे । तोचि हृदईं दिसे अगा रया॥ १ ॥ नाहीं तो आहे न दिसे ना पाहे । अवघा होऊनि राहे

तन्मयता ॥ २ ॥ स्वरूप उखर नमो मनसार। एकतत्त्वनिर्धार हरि नांदे ॥ ३ ॥ निवृत्तीची खूण अवघेंचि होणें। एका नारायणें भरलें दिसें ॥ ४ ॥

७२ विश्वीं विश्वपति असे लक्ष्मीनाथ। आपणचि समर्थ सर्वांरूपीं ॥ १ ॥ तें रूप गोकुळीं नंदाचिये कुळीं। यशोदेजवळीं बाळकृष्ण ॥ २ ॥ सर्वघटीं नांदे एकरूपसत्ता। आपणचि तत्वतां सर्वांरूपीं ॥ ३ ॥ निवृत्तीचें पार कृष्णचि पैं सार। गोकुळीं अवतार नंदाघरीं ॥ ४ ॥

७३ एकरूप दिसे भेदरूपें भासे। ज्ञानियासी कैसें एकतत्व ॥ १ ॥ तत्वतां श्रीहरि एक असे सर्व। सांडूनि देहभाव पूर्ण पाहा ॥ २ ॥ देवेंविण कोठें रितें नाहीं सर्वथा। संपूर्ण परता हरि आहे ॥३॥ निवृत्तीची खूण एकतत्वरूपें। पाहतां हें सोपें गुरुखुणें ॥४॥

७४ देहाच्या दीपकीं एकी वस्तु चोख। असोनियां शोक कां करितोसी ॥१॥ देहभरि आत्मा नांदे निरंतर। असतां हा विचार कां धांवतोसी ॥ २ ॥ तुझें तूं पाही आहे तें घेईं। एकरूप होईं गुरुखुणें ॥ ३ ॥ निवृत्तीचें सार हरिरूप सदा। नित्य परमानंदा रातलासे ॥ ४ ॥

७५ नेणों पै द्वैत अवघेंचि अद्वैत। एकरूप मात करूं आम्हीं ॥१॥ अवघाचि श्रीहरि नांदे घरोघरीं। दिसे चराचरीं ऐसें करा ॥२॥ सेवावे चरण गुरुमुर्तिध्यान। नयनी संपन्न ब्रम्हरसें ॥ ३ ॥ निवृत्ति चोखडा ब्रम्हरसु उघडा। गुरुकृपें निवाडा निर्वाडिला ॥४॥

७६ समता धरा आधीं टाका द्वैतबुद्धि। आपें आप शुद्धि गोविंदीं रया ॥ १ ॥ सम नांदे हरि विषम अघोरीं। निवृत्ति चराचरीं सांगतुसे ॥ २ ॥ सम शेजबाज सम सम केशीराज। सम तुष्टे भोज आत्मराज ॥ ३ ॥ निवृत्तीचें धन अखंड परिपूर्ण। आपणचि नारायण तुष्टे सदा ॥ ४ ॥

७७ राम राम जप समत्वें साधावा। अहंकार टाकावा अहंबुद्धि ॥१॥ सुटसी रे नामें आपें आप संभ्रमें। नित्य नाम नेमें जपतु जावें

॥ २ ॥ देवेंविण नाहीं सर्व शास्त्र बोले । हरिरूपीं बोधलें तेंचि धन्य ॥ ३ ॥ सुखावरी सुख निःसंग रे आचरे । केशव निर्धारें तुष्टे सदा ॥ ४ ॥ निवृत्ति म्हणे पुण्य होईल अगाध । एकनामें गोविंद तुष्टे सदा ॥ ४ ॥

७८ दुभिले द्विजकुळीं आलें पैं गोकुळीं । नंदयशोदे जवळीं बाळकृष्ण ॥ १ ॥ खेळे लाडेंकोडें गौळणी चहूंकडे । नंदाचें केवढें भाग्य जाणा ॥ २ ॥ ज्या रूपें वेधलें ब्रम्हांड निर्मळें । तेंचि हें आकारलें कृष्णरूपें ॥ ३ ॥ निवृत्ति दिवटा कृष्णाचिया वाटा । नामेंचि वैकुंठा पावन होती ॥ ४ ॥

७९ देहीं देव आहे हे बोलती वेद । परि वासनेचे भेद न दवडिती ॥१॥ वसना पैं चोख तेथेंचि वैकुंठ । भावोचि प्रगट होय जना ॥ २ ॥ नलगती सायास करणें उपवास । नाममात्रें पाश तुटे जना ॥३॥ निवृत्ति पाहातु देहामामीं प्रांतु । देवोचि दिसतु सर्वां घटीं ॥४॥

८० जाणिवेचेनि पैसे वासना हे हिंडे । आनान ब्रम्हांडें शोधिताहे ॥१॥ तैसें नको जना निरंतर वासना । वैकुंठभजना करिजो रया ॥२॥ जाणीव नेणीव अवघा श्रीअनंत । नेणोनि उचित हरि भजे ॥ ३ ॥ निवृत्तीचें तट भजन अविनाश । भजनेंचि पाश तुटे रया ॥४॥

८१ एकतत्त्व हरि अवघी सृष्टी त्याची । वासना मोहाची जाली असे ॥१॥ तत्व तें श्रीहरि अद्वैत कुसरी । ब्रम्हांडवोवरी क्षरलासे ॥ २ ॥ त्रिपुटी त्रिगुण सत्वरजसार । नामेंचि वेव्हार तुटे रया ॥३॥ निवृत्ति समता हरिप्रेमगुण । कृष्ण हेंचि ध्यान मनामाजीं ॥४॥

८२ शांतीचें भजन क्षमेचा कळवळा । गोपाळ सकळां देहीं नांदे ॥ १ ॥ आचार पवित्र नामचि पैं पात्र । सांठविलें शास्त्र दों अक्षरीं ॥२॥ रूपाचें सगुण निर्गुण दाटलें । नामेंचि आटलें

मोहजाळ ॥३॥ निवृत्ति पडळ उडालें पैं भान । गयनीनें ज्ञान उपदेशिलें ॥४॥

८३ भेदूनि ब्रह्मांड आणियेली कळा । नित्यता सोहळा हरिप्रेमें ॥ १ ॥ हरि धरा चित्तीं मन मारा मुक्ती । प्रपंचसमाप्ति हटेंपाटें ॥ २ ॥ विश्रांतीसी स्थान आसनीं शयनीं । हरिध्यानपर्वणी पुरे आम्हां ॥ ३ ॥ निवृत्तिसागर हरिरूप नित्य । सेविला तो सत्य दों अक्षरीं ॥ ४ ॥

८४ दीपाची कळिका दीपीं कीं सामावे । तैसा जीवशिव बोळखीजो जी ॥ १ ॥ दीप आहे देहीं तयाचे हे प्रकाश । त्याचेनि सावकाश हरि मजे रया ॥२॥ न मिळे आयुष्य न मिळे घटिका । देह क्षण एका जाईल रया ॥३॥ निवृत्तीचा दीप दीपचि ये मुसे । आटोनी सौरसें एक जाला ॥४॥

८५ कळिकेसी ज्योति सामावली तेजीं । तैसा हरि हा सहजीं सर्वगतु ॥ १ ॥ सर्वत्र भजन हरि हेचि खूण । हरि हा प्रमाण दों अक्षरीं ॥ २ ॥ नित्यमुक्त एक आत्मत्व दीप । हरि हा संकल्प करिजेसु ॥ ३ ॥ निवृत्ति सर्वदा हरिभजन दाट । नित्यता वैकुंठ अखंडित ॥ ४ ॥

८६ अनुभवाच्या गांवीं ज्ञान हेंचि फळ । विज्ञान केवळ वृक्ष तया ॥ १ ॥ साधनीं स्वानुभव अनुभवीं अनुभव । ब्रम्हाची राणीव आम्हां घरीं ॥ २ ॥ रिकामा बरळु नसें खेळें मेळें । ब्रम्हचि कल्लोळें भोगीतुसे ॥ ३ ॥ निवृत्ति सरळ निरसलें अज्ञान । सर्वत्र संपन्न आत्माराम ॥ ४ ॥

८७ गगनघांस घोटी सर्व ब्रम्हांडें पोटीं । निमूनियां शेवटीं निरालंबीं ॥ १ ॥ तें ब्रम्ह सांवळें माजीं लांडेंकोडें । यशोदेमायेपुढें खेळतसे ॥ २ ॥ ब्रम्हांडाच्या कोटी तरंगता उठी । आप आपासाठीं होत जात ॥ ३ ॥ निवृत्तीचें ध्यान यशोदेचें धन । वासुदेव खूण आम्हांमाजीं ॥ ४ ॥

८८ प्रकृतीचेनि घायें घायवट नव्हे। आत्मारामसोयें आत्मकळिके ॥ १ ॥ कळिका उन्मनी गोल्हाट कवळी। सत्रावीचे जवळी आत्मा स्वामी ॥२॥ हे खूण घेईं सोपानाजवळीं। मनाची काळजी उरों नेदी ॥ ३ ॥ निवृत्ति म्हणे ज्ञान सोपान सांग। विकल्पाचा पांग नाहीं नाहीं ॥४॥

८९ क्षमा सम नेम हाचि परिपूर्ण। राम होई तूं निष्काम निःसंदेह ॥ १ ॥ तूंचि रे साचार होसील पूर्णता। निर्गुणीं समता नाहीं जैशी ॥ २ ॥ व्योमामाजीं अभ्र जातसे सरळ। त्यासी अळुमाळ दृश्य नव्हे ॥३॥ निवृत्ति म्हणे नव्हे हें तैसें चोख। अंतरबाह्य वेष आत्मरूपें ॥४॥

९० रामनाम मुखीं तो एक संसार। येऱ्हवीं अघोर नरक रया ॥ १ ॥ संसारनरक रामनामसार। तरले पामर पतित देखा ॥२॥ अजामिळ नामें तरला पतित। नारायण त्वरित आले तेथें ॥ ३ ॥ हरिनाम हेंचि शास्त्र पै जयाचें। तयासी यमाचें भय नाहीं ॥४ ॥ उघडा मोक्षमार्ग गोविंदस्मरणें। रामनामकीर्तनें मोक्षपद ॥ ५ ॥ निवृत्तिसंचित रामनाम महिमा। अवघीच पौर्णिमा हरिपाठें ॥६॥

९१ सोपान सवंगडा स्वानंद ज्ञानदेव। मुक्ताईचा भाव विठ्ठलराज ॥ १ ॥ दिंडी टाळ घोळ गाती विठ्ठलनाम। खेचरासी प्रेम विठ्ठलाचें ॥ २ ॥ नरहरि विठा नारा ते गोणाई। प्रेमभरीत डोहीं वोसंडती ॥ ३ ॥ निवृत्ति प्रगट ज्ञानदेवा सांगे। पुंडलीकसंगे हरि खेळे ॥ ४ ॥

९२ काला तंव निकटी श्रीरंग जाले। भक्तांचे सोहळे पुरविले ॥ १ ॥ वेणुनादीं काला एकत्र पै जाला। दहीभात झेला झेलीतु देव ॥ २ ॥ तोचि कवळु घेतु नामयासी देतु। ज्ञानासी भरीतु पूर्णदोषें ॥ ३ ॥ निवृत्ति सोपान कालवले कालीं। खेचरासी घाली ताहानभूक ॥४॥

९३ वैष्णवांचा मेळ सकळ मिळाला। विठ्ठलनाम काला पंढरीसी ॥ १ ॥ हरिनाम विनट हरि उच्चारीत। सप्रेम डुलत भक्तजन

॥ २ ॥ चालिला सोपान ज्ञानदेवानेधी । मुक्ताई गोविंदीं तल्लीनता ॥ ३ ॥ निवृत्ति खेचर परसा भागवत । आनंदें डुलत सनकादिक ॥ ४ ॥

९४ चांगया लाधलें नामया फळलें । दिधलें विठ्ठलें हरिकृपा ॥ १ ॥ प्रेमाचे पुतळे भीमातीरा आले । जयजयकार केले हरिभक्तीं ॥ २ ॥ वैकुंठ आपण भक्तामाजीं खेळे । पुंडलीकलीळें खेळतुसे ॥ ३ ॥ निवृत्ति निवाला आनंदें नाचतु । उन्मनी भरितु ज्ञानदेव ॥४॥

९५ आनंद सर्वांचा काला अरुवार । नामया साचार फुंदतुसे ॥ १ ॥ राहीरखुमाई सत्यभामा माता । आलिया त्वरिता काल्यामाजीं ॥ २ ॥ उचलिला नामा प्रेमाचें स्फुंदन । नुघडी तो नयन कांहीं केल्या ॥ ३ ॥ बुझावीत राही रखुमादेवी बाही । पितांबर साई करिती हरि ॥ ४ ॥ ज्ञानासी कवळु सोपानासी वरु । खेचरा अरुवारु कवळु देतु ॥ ५ ॥ निवृत्ति पूर्णिमा भक्तीचा महिमा । नामयासी सीमा भीमातीरीं ॥६॥

९६ तंव आनंदला हरिपूर्ण लोटला । मुक्ताई लाधला प्रेमकवळु ॥ १ ॥ चांगयाचे मुखीं घालीत कवळु । आपण गोपाळु दयासिंधु ॥ २ ॥ दिधलें तें घेई पूर्ण तें होई । सप्रेमाचे डोहीं संतजग ॥ ३ ॥ नामया विठया नारया लाधलें । गोणाई फावलें अखंडित ॥ ४ ॥ राही रखुमाई कुरवंडी करिती । जिवें वोंवाळिती नामयासी ॥५॥ निवृत्ति खेचर ज्ञानदेव हरि । सोपान झडकरी बोलाविला ॥६॥

९७ आपलेनि हातें कवळु समर्पी । ब्रम्हार्पण मुखीं ब्रम्हपणें ॥ १ ॥ सोपान सांवता निवृत्तिनिधान । यांसि जनार्दन कवळ देतु ॥ २ ॥ ब्रम्हपद हरि बाम्ह अभ्यंतरीं । सर्वत्र श्रीहरि दिसे तयां ॥ ३ ॥ देऊनि हस्तक पुशी पीतांबरें । पुसतसे आदरें काय आवडे ॥ ४ ॥ राही रखुमाई कांसवीतुषार । अमृतपाझर सर्वांघटीं ॥५॥ निवृत्ति खेचर सोपान सांवता । हरि कवळु देतां तृप्त जाले ॥६॥

९८ गोपाळ सवंगडे आले वाडें कोडें। असंख्य बागडे हरिरूपीं ॥ १ ॥ बिंबली पंढरी हरिरूपीं सार। अवघा शृंगार विठ्ठलराजु ॥ २ ॥ कालया कौशल्य नामदेव जाणें। तेथिलीये खुणें निवृत्तिराजु ॥ ३ ॥ ज्ञानदेव सोपान जगमित्र नागा। नरहरि वेगा झेलिताती ॥ ४ ॥ वैकुंठ सांवळें माजीं भक्तमेळे। काला एक्या काळें करिताती ॥ ५ ॥ निवृत्ति संपूर्णता घेऊनि उद्गारू। सेविला उदारू हरिराणा ॥६॥

९९ पांडुरंग हरि माजीं भक्तजन। कैसें वृंदावन शोभतुसे ॥१॥ ब्रम्हादिक ठेले विमानें अंबरीं। काला तो गजरीं पंढरीये ॥ २ ॥ सनकादिक देव देहुडा पाऊलीं। गोपाळ वांकुली दाविताती ॥ ३ ॥ पुंडलीक नाचे देवमुनी सर्व। भीमातीरीं देव प्रगटले ॥४॥ ज्ञानदेव सोपान विसोबा खेचर। नरहरि सोनार नाचताती ॥५॥ निवृत्ति मुक्ताई चांगदेव गाढा। हरीचा पवाडा झेलिताती ॥६॥

१०० न साधे योगीं न संपडे जगीं। तें नंदाच्या उत्संगीं खेळे रूप ॥ १ ॥ कृष्ण माझा हरि खेळतो गोकुळीं। गोपिकां सकळीं वेढियेला ॥ २ ॥ गायींचे कळप गोपाळ अमुप। खेळतसे दीप वैकुंठीचा ॥ ३ ॥ निवृत्ति दीपडें वैकुंठ सांवडें। यशोदामाये कोडें चुंबन देत ॥४॥

१०१ सूर्यातें निवटी चंद्रातें घोंटी। उन्मनी नेहटी बिंबाकार ॥ १ ॥ तें रूप सांवळें योगियांचें हित। देवांचें दैवत कृष्ण माये ॥ २ ॥ सत्रावी उलंडी अमृत पिऊनी। ब्रम्हांडनिशाणी तन्मयता ॥३॥ निवृत्ति अंबु हें बोळलें अमृत। गोकुळीं दैवत नंदाघरीं ॥४॥

१०२ विश्वामाजीं अक्षर क्षरलें साचार। त्या रूपा आधार। पुससी काई ॥१॥ आपणचि विश्व आपणचि विश्वेश। जेथें द्वैताद्वैत मावळले ॥२॥ निवृत्ति म्हणे तें रूप संतांसमीप। ध्याती आपेंआप बोसंडत ॥३॥

१०३ नाहीं दिनमान नाहीं तेथें रात्री। अवघेचि गोत्रीं लावियेले १ ॥ उदो अस्तु ठेला वेदासि अबोला। श्रुतीचा संपला वाव

जेथें ॥२॥ तेथील तारक ब्रम्ह निजसुख । केलासे विवेक सनका-
दिकीं ॥ ३ ॥ निवृत्ति गयनी लाविली उन्मनी । पावले निर्वाणीं
ब्रम्हपद ॥४॥

१०४ मी माझें रोकडें केलें फाडोवाडें । ब्रम्हांडाएवढें ढिसाळ
थोर ॥१॥ मी माझें टवाळ अवघांचि गोपाळ । मी तों सोज्जवळ
ब्रम्हरूपें ॥ २ ॥ मीपण नुरतें तूंपण त्वरें । वेगीं विठ्ठलघुरे शरण
जाऊं ॥ ३ ॥ निवृत्ति म्हणे मीतूंपण सगळा । तुजमाजीं गोपाळा
रहिवास ॥४॥

१०५ हरिविण दैवत नाहीं पै आनु चित्तीं । अखंड श्रीपतिनाम
वाचे ॥ १ ॥ रामकृष्णमूर्ती आजप आवृत्ति । नित्य नामें तृप्ती
जाली आम्हां ॥२॥ नामाचेनि स्मरणें नित्य पैं सुस्नात। दुजियाची
मात नेणों आम्हीं ॥३॥ निवृत्ति जपतु अखंड नामावळी । हृदय-
कमळीं केशीराज ॥४॥

१०६ हरिवीण चित्तीं न धरी बिपरीत । तरताती पतित राम-
नामें ॥१॥ विचारूनि पाहा ग्रंथ हे अवघे । जेथें तेथें सांगे रामनाम
॥२॥ व्यासादिक भरले रामनामपाठीं । नित्यता वैकुंठीं तयां घर
॥६॥ शुकादिक मुनि विरक्त संसारीं । रामनाम निर्धारी उच्चारिलें
॥४॥ चोरटा वाल्मीक रामनामीं रत । तोही येक सरत रामनामें
॥५॥ निवृत्ति साचार रामनामीं दृढ । अवघेंचि गूढ उगविलें ॥६॥

१०७ ज्ञानाचिया गोष्टी सांगतो चावटी । भाव नाहीं पोटीं
काय करूं ॥१॥ भावबळें दैव भावबळें देव । भक्तीचा सद्भाव
पहातुसे ॥२॥ जना उपदेशी विश्वीं हृषीकेशी । आपण भक्तीसीं
दुऱ्हावित ॥ ३ ॥ निवृत्ति म्हणे ज्ञान असें हें सकळ । जेथें अद्वैत-
कृपाळ बिंबतसे ॥४॥

१०८ एकेवीण दुजें तत्त्व नाहीं पैं सृष्टीं । विश्वरूपें भेटी
अर्जुनासी ॥१॥ त्या रूपें वेधिलें काय करूं सये । एकरुप होय
कृष्णराजा ॥२॥ न दिसें पैं द्वैत अद्वैत श्रीहरि । अवघा घरोघरीं

हरि नांदे ॥ ३ ॥ निवृत्तिपरिवार एकतत्व दिवटा । एक्या रूपें वैकुंठा नेतु असे ॥४॥

१०९ एकेंवीण पाहा न दिसे द्वैत । एकी हेचि मात वेदशास्त्रीं ॥१॥ वेदशास्त्र सांगे आम्हां हा श्रीरंग । या नाहीं भंग आत्मपणें ॥२॥ आनंदैक सुख यासी नाहीं मोहो । भूतबाधा ग्रहो नामेचि तारी ॥ ३ ॥ निवृत्ति म्हणे पिता सकळतत्वरहितु । वेदशास्त्रीं दृष्टांतु पहा तुम्हीं ॥४॥

११० देवेंवीण ठावो नाहीं इये महीं । आत्मप्रकाश पाहीं बिंबलासे ॥१॥ वासनासंगु करिते पांगु । जीवशीवभंगु कल्पनेचा ॥२॥ सर्व जीव शिव हाचि धरा भाव । हारपला सर्व हरिरूपीं ॥ ३ ॥ निवृत्ति तारक हरिरूप येक । हाचि येक विवेक एकतत्त्वें ॥४॥

१११ मोक्ष मुक्ती चारी एकतत्व हरीं । बाहीजू भीतरीं हरि करा ॥१॥ तराल स्वभावें एकाएक देवें । येक हरी भावें ऐसा कीजे ॥२॥ ठाका हें पैं द्वैत अद्वैतसिद्धांत । मोक्षमार्गहेत एका तत्वें ॥ ३ ॥ निवृत्तिचा मार्ग एकरूपें सांग । नाहीं पैं पांग कल्पनेचा ॥४॥

११२ मी माझी कल्पना नाहीं मजसवें । दिननिशीं उगवे हरि माये ॥१॥ हरिविण दुजें न देखे त्रिभुवनीं । नायकीजे कानीं भेदबुद्धी ॥२॥ वेदीं ठेलें कर्म शास्त्रांसी मोहन । शेषासी अनुमान नकळे माये ॥३॥ निवृत्तिदेवीं घर हरि आमुचा माये । हरि एक पाहे विश्वरूपीं ॥४॥

११३ संसार सुफळ हरिनाम उच्चारितां येऱ्हवीं मरतां अधोगति ॥१॥ संसार असारु श्रीपति साचारु । नामेंवीण पारु न पविजे ॥२॥ हरि हरि म्हणतां उतरले पार। दूर्धर संसार तरले रया ॥ ३ ॥ निवृत्तीचा जप हरि हा उच्चार । संसारसागर तारक हरि ॥४॥

११४ हरिमार्गसार येणेंचि तरिजे । येऱ्हवीं उभजे संसार रया ॥१॥ जपतां श्रीहरि मोक्ष नांदे नित्य । तरेल पैं सत्य

हरिनामें ॥२॥ काय हें ओखद रामनाम अमृत। हरिनामें तृप्त करी रया ॥३॥ निवृत्ति साचार हरिनाम जपतु। नित्य हृदयांतु हरिहार ॥४॥

११५ एकेवीण दुजें नाहीं पैं सृष्टीं। हें ध्यान किरीटी दिधलें हरि ॥ १ ॥ नित्य या श्रीहरी जनीं पैं क्षरला। द्वैताचा अबोला तया घरीं ॥२॥ हरीविणें देवो नाहीं नाहीं जनीं। अखंड पर्वणी हरि जपतां ॥ ३ ॥ निवृत्तिसाकार हरिनामपाठ। नित्यता वैकुंठ हरिपाठें ॥ ४ ॥

११६ जपतां कुंटिणी उतरे विमान। नाम नारायण आलें मुखा ॥१॥ नारायणनाम तारक आम्हां। नेणों पैं महिमा अन्यतत्व ॥२॥ तारिले पतीत नारायणनामें। उद्धरिले प्रेमें हरिभक्त ॥३॥ निवृत्ति उच्चार नारायणनाम। दिननिशीं प्रेम हरि हरि ॥४॥

११७ एकतत्त्व हरि असे पैं सर्वत्र। ऐसें सर्व शास्त्र बोलियेलें ॥१॥ हरिनामें उद्धरे हरिनामें उद्धरे। वेगीं हरि त्वरें उच्चारी जो ॥२॥ जपतां पैं नाम यमकाल कांपे। हरि हरि सोपें जपिजेसु ॥३॥ निवृत्ति म्हणे हरिनामपाठ जपा। जन्मांतरखेपा अंतरती ॥४॥

११८ द्वैताचा दुकाळ अद्वैताच्या देशीं। प्रपंच उपवासी मेला राया ॥ १ ॥ नाहीं नाहीं चाड इंद्रियांचें कोड। कृष्ण हेंचि वाड हृदयीं आम्हां ॥२॥ देहाचा दिवटा अखंड पैं काळ। निरंतर सोहळा कळीं नाहे ॥ ३ ॥ निवृत्ति परम निरंतर सम। सर्वांघटी राम बिबलासे ॥ ४ ॥

११९ ज्या रूपाकारणें वोळंगती सिद्धि। हरपती बुद्धी शास्त्रांरें चिया ॥ १ ॥ तें रूप साजिरें गोकुळीं गोजिरें। यशोदे सोपाळ कडिये शोभ ॥ २ ॥ नसंटे त्रिभुवनीं नाकळे साधनीं। नंदाच्या आंगणीं खेळे हरि ॥ ३ ॥ निवृत्तिनिधडा रूप चहूंकडा। गोपाळ बागडा गोकुळीं वसे ॥ ४ ॥

१२० गगनीं अभ्र चाले चंद्र असे निश्चळ। पृथ्वीतळीं बाळ चाले म्हणे ॥१॥ भ्रमाचें भुलीव आलें ते पडळ। प्रत्यक्ष कंव॥

डोळीयांसी ॥२॥ असें तें न दिसें नसें तें आभासें । विषयाच्या विषें घारलेंसें ॥ ३ ॥ निवृत्तिकवळ भ्रमाचा सांडिला । अखंड ध्यायिला हृषीकेश ॥ ४ ॥

१२१ गगनींचि तारा वायो वसे सैरा । गगनगाभारां स्थिर होय ॥१॥ अवचित गगनीं वर्षे संपूर्ण । आपणचि पतन तारा पावे ॥२॥ निवृत्तितारा त्यापरि विचारा । रामनाम धरा तरावया ॥३॥

१२२ द्वैताचीये प्रभे नसोन उरला । निराकार संचला एकरूप ॥१॥ तें हें सांवळें स्वरूप डोळस । बाळरूपमीस घेतलेंसे ॥ २ ॥ तिहीं लोकीं दुर्लभ नकळे जीवशिवीं । तो आपणचि लाघवी मावरूपें ॥ ३ ॥ निवृत्तीचें सार जीवशिव बिढार । गुरूनें निर्धार सांगितला ॥ ४ ॥

१२३ अव्यक्ताचें घरीं व्यक्त पैं नांदे । मायेचेनि छंदें जगत बी ॥ १ ॥ गगनीं अभ्रपडळ वायोसंगें येत । तैसें तें निभ्रांत मेघवृष्टीं ॥ २ ॥ अद्वैत संचलें द्वैताचा आचार । मायेचा घराचार ओडंबरी ॥ ३ ॥ निवृत्तिदेवीं धरिली माया हे असार । प्रपंचपरिवार निर्दाळिला ॥ ४ ॥

१२४ परेसी परता नकळे पैं शेषा । तो गौळियां अशेषांमाजीं घरीं ॥ १ ॥ भाग्य पैं फळलें नंदाघरीं सये । यशोदा पैं माय परब्रह्माची ॥ २ ॥ गौळिये नांदती गोधनाचे कळप । त्यामाजीं स्वरूप कृष्णमूर्ती ॥३॥ निवृतीचें ध्यान गोपाळ अमुचा । आतां जन्म कैंचा भक्तजना ॥ ४ ॥

१२५ प्रकृपुरुष नांदताती घरीं । अखंड शेजारीं ब्रह्मसुखें ॥१॥ नाहीं मायाभुली प्रपंच अबोला । ब्रह्मसुख धाला रहिवासु ॥ २ ॥ विषयगरळा टाकिला अभिमानु । सर्व जनार्दनु आम्हां घरीं ॥३॥ निवृति प्रकृतिपुरुष नांदती । सर्वत्र श्रीपति होऊनि ठेला ॥ ४ ॥

१२६ गगनींचा ईश गगनीं समरसें । अवचिता काळपाश टाकीतुसे ॥१॥ न लोटे पैं निशीं कैंचा अहर्निशीं । काळाचे कवेसि

जनु आहे ॥२॥ निवृत्ति म्हणे जन नेणतां पतन । हरिचरणीं मन स्थिर होय ॥ ३ ॥

१२७ गगनींचा घन जातू पैं वारेन । अवचिता पतन अधः पंथें ॥ १ ॥ अधऊर्ध्व हरि भाविला कुसरीं । प्रपंचबाहेरी आपें आप ॥२॥ निवृत्ति म्हणे जन हरीचें स्वरूप । काळाचें पैं माप हरिनामें ॥ ३ ॥

१२८ सृष्टीच्या संमता सुरतरु तरु । बोलिला विस्तारु धर्मशास्त्री ॥१॥ नेघों हे तरु प्रपंचपरिवारु । प्रत्यक्ष ईश्वर पुरे आम्हां ॥२॥ कल्पतरु तरु इच्छेसि सागरु । त्याहूनी आगरू हरि माझा ॥ ३ ॥ निवृत्ति पै सुब्रह्मची प्रकाशु । विठ्ठल रहिवासु आम्हां पुरे ॥४॥

१२९ चंदनाचें झाड परिमळें वाड । त्याहूनि कथा गोड विठ्ठलाची ॥१॥ परिमळुसुमनीं जाईजुईमोगरे । त्याहूनि साजिरे हरि आम्हां ॥२॥ आम्हां धर्म हरि आम्हां कर्म करि । मुक्तमार्ग चाऱ्ही हरि आम्हां ॥ ३ ॥ कां कल्पतरु इच्छेसि सागरु । त्याहूनि आगरु हरि माझा ॥४॥ निवृत्तिसुवासु ब्रम्हींचा प्रकाशु । विठ्ठल रहिवासु आम्हां पुरे ॥ ५ ॥

१३० सृष्टीच्या संमता सुरतरु तरु । बोलिसा विस्तारु धर्मशास्त्रीं ॥ १ ॥ नेघों हे तरु प्रपंच विस्तारु । प्रत्यक्ष ईश्वरु पुरे आम्हां ॥ २ ॥ निवृत्ति निवांत हरीच सेवीत । दो अक्षरीं उचित इंद्रियांसी ॥ ३ ॥

१३१ कमळाच्या स्कंधीं गुंफीं गुढारलें । वरी आकारलें फूल तया ॥ १ ॥ सुमनाचेनि वासें भ्रमर भुलले । मार्ग पैं विसरले इंद्रियांचा ॥२॥ तैसे हे संत विठ्ठलीं तृप्त । नित्य पैं निवांत हरिचरणीं ॥ ३ ॥ नाठवे न दिन नाठवे निशी । अखंड आम्हांसि हरिराजा ॥ ४ ॥ तल्लीन प्रेमाचे कल्लोळ अमृताचे । डिंगर हरीचे राजहंस ॥ ५ ॥ टाहो करूं थोरु विठ्ठलकीर्तनें । नामाच्या सुमनें हरि पूजूं ॥ ६ ॥ निवृत्ति निवांत तल्लीन पैं जाला । प्रपंच अबोला हरिसंगें ॥ ७ ॥

१३२ सर्वभूतीं दया शांति पैं निर्धारा । तो योगी साचार जनीं इये ।। १ ।। नलगे मुंडणें काया हे दंडणें । अखंड कीर्तनें स्मरे हरि ।।२।। शिव जाणें जीवीं क्षरला चैतन्य। हें जीवीं कारुण्य सदा भावी ।। ३ ।। गगनीं सूर्य तपे अनंत तारा लोपे । येकुचि स्वरूपें आत्मा तैसा ।।४।। उगवला कळीं उल्हासु कमळीं। तैसा तो मंडळीं चंद्र देखा ।।५।। निवृत्तिमंडळ अमृत सकळ । घेतलें रसाळ हरिनाम ।। ६ ।।

१३३ देहाच्या देउळीं राउळ निद्रिस्त । मायेचें अनुचित भुलि-वेशीं ।। १ ।। चेतवला आत्मा अचेत पैं हरि । कर्म भरोवरीं खुंटलें रया ।। २ ।। भ्रांत माया सदा परि वैरिणी । मारूनी जीवनीं जीव ठेवी ।।३।। निवृत्ति अमर आत्माचि साचार । मायादेवीं घर ब्रम्ह केलें ।।४।।

१३४ सजीव साजिरी तिगुणा गोजिरी । नांदे माजि घरीं आत्मराजु ।।१।। सदाचार आम्हां नित्य हरिप्रेमा । नेणों मनोधर्मा प्रपंचाचिया ।।२।। नित्य पैं सोंविळा अखंड पै निर्मळा । क्षणीं बारा सोळा म्हणाल रया ।।३।। निवृत्तिदेवीं कळिका पै अमूप । विश्वीं विश्वरूप दावितसे ।।४।।

१३५ नाहीं जनीं विजनीं विज्ञानी । निर्गुण काहाणी आम्हां घरीं ।। १ ।। सुलभ हरि दुर्लभ हरि । नांदे माजीं घरीं आमचीये ।।२।। आनंदें सोहळा उन्मनी चित्कळा । नामचि जिव्हाळा जिव्हे सदा ।।३।। निवृत्तिदेवीं साधनीं राणीव। हरपले भाव इंद्रियांचे ।।४।।

१३६ ज्याचेनि सुखें चळ पैं विश्व । नांदे जगदीश सर्वां घटीं ।। १ ।। ज्याचेनि सुखें चळत पैं विश्व । नांदे जगदीश सर्वां घटीं ।। २ ।। त्याचें नाम हरि त्याचें नाम हरि । प्रपंच बोहरी कल्पनेची ।। ३ ।। शांति त्याची नारी प्रकृति कामरी । उन्मनी बोवरी हृदयांतु ।। ४ ।। निवृत्तिदेवीं धरिली निर्गुणीं । शांति हे संपूर्णीं हरिप्रेमें ।।५।।

१३७ विनट विठ्ठला प्रकृति अबोला । सतत संचला नेणो हरी ॥१॥ मोहे वेंटाळला पाहे चहूंकडे । प्रपंच गडबडे लोळतुसे ॥२॥ निवृत्तिदेवीं प्रपंचु पैं सोडिला । प्रकृति अबोला ब्रम्हडोहीं ॥ ३ ॥

१३८ हरिविण भावो तो वायांची संदेहा । हरि देवा देवो आहे सत्य ॥ १ ॥ हरि हरि वाचे ऐसें जपा साचें । नाहीं त्या यमाचें मोहोजाळ ॥२॥ हरिविण सार नाहीं पैं निर्धार । हरिविण पार न पवीजे ॥३॥ निवृत्ति श्रीहरि चिंतितां निरंतरीं । हरि येकु अंतरीं सर्वी नांदे ॥ ४ ॥

१३९ ध्यान धरा हरि हरि विश्रांति नामाची । विठ्ठलीं साची मनवृत्ति ॥ १ ॥ ध्यानेंविण मन विश्रांतिवीण स्थान । सूर्येवीण गगन शून्य दिसे ॥ २ ॥ नलगे साकार विठ्ठलमनोवृत्ति । प्रपंच-समाप्ती तीं अक्षरीं ॥ ३ ॥ निवृत्तिसंमता विठ्ठलकीर्तन । करितां अनुदिन मनमेळ ॥ ४ ॥

१४० रूप ध्यावो ध्यानीं आईको पैं कीर्तनीं । पारणें श्रवणीं नयनाचिये ॥ १ ॥ हृदयीं विठ्ठलु ध्यातां निरंतरु । वैकुंठ साचारु प्राणि यांसी ॥२॥ अनंता जन्मांचें प्रायश्चित हरि । विठ्ठल साजिरी श्रीदावळी ॥३॥ निवृत्तिसाधन रूप ध्याये ध्यानीं । मनाची उन्मनी हरिचरणीं ॥४॥

१४१ काया हे ब्रह्मांड ठसावले पिंड । जीव जीवनीं अंड एका तत्वें ॥ १ ॥ आत्मा चराचरीं व्यापक कुसरीं । एक तत्त्व निर्धारी क्षरलासे ॥२॥ घटमठ व्यापिलें आपेंआप संचरलें । कल्पनें बुडालें संकल्प रया ॥ ३ ॥ निवृत्तीचें निराळ जीवन पैं सकळ । प्रत्यक्ष गोपाळ दिठीं दिसे ॥ ४ ॥

१४२ प्रथम अक्षर क्षरलेसे साचार । तेंचि चराचर बिंबलेंसे ॥१॥ अर्जुनीं क्षरला अक्षर संचला । विश्वरूप अबोला एका तत्वें ॥ २ ॥ आत्मा हा अवीट बिंबलासे नीट । स्मरतांची पैं वैकुंठ देतु आम्हां ॥ ३ ॥ निवृत्तिप्रतिमा अक्षरीं दिनव्योमा । एकतत्वीं सीमा ध्ययिजेसु ॥४॥

१४३ निराकारीं घर आकारलें व्यर्थ । सांगता परमार्थ न बुझे हरी ॥ १ ॥ काय करूं माये कैंवा हा गोंवळू । सरळ सुकुळु नाहीं म्हणे ॥ २ ॥ देहाचिया दीपकीं नाहीं म्हणे माया । तेजाकारें छाया हाचि घेतु ॥ ३ ॥ निवृत्तीचें सार प्राणापानीं स्थिर । मनें चराचर आराधिलें ॥४॥

१४४ व्यर्थ हा प्रपंच विस्तारला सावा । पहातां आहाचा फुकट, रया ॥ १ ॥ सत्रांवटीं हरि क्षरोनियां घरीं । वैकुंठ कामारी भोगी-तसे ॥ २ ॥ यासी नाहीं द्वैत आपणचि अद्वैत । सर्वरूपीं संमत एकतत्वें ॥ ३ ॥ निवृत्तिप्रति माव येत्र येसा व्योमा । प्रपंचगरिमा नाहीं तेथें ॥४॥

१४५ प्रपंचाची वस्ति व्यर्थ काह्या काज । आम्हां बोलतां लाज येत सये ॥ १ ॥ काय करूं हरि कैसा हा गवसे । चंद्रसूर्य अंवसे एकसूत्र ॥२॥ तैसें करूं मन निरंतर ध्यान । उन्मनी साधन आम्हां पुरे ॥ ३ ॥ निवृत्तिपरिपाठ हरिनाम हेचि वाट । प्रपंच फुकट दिसे आम्हां ॥४॥

१४६ लटिका संसार वाढविसी व्यर्थ । विषयाचा स्वार्थ मनें करीं ॥१॥ नको शिणों दुःखें कां भरसि शोभें । एकतत्वें एकें मना लावी ॥२॥ लावी उन्मना टाळी । टाळिसी नेई वाळी । अखंड वनमाळी । हृदय घटीं ॥३॥ निवृत्ति चपळ राहिला अचळ । नाहीं काळवेळ भजता हरि ॥४॥

१४७ केवळ देहीं आतमा असोनि हिंडसी । गर्भवासा येंशी नाना जन्मीं ॥१॥ मन करी एकट आतमा करी सुभट । आपेआप वैकुंठ एका तत्वें ॥ २ ॥ या रूपें चिंतितां आत्मरूपें पाहतां । तत्वींतत्व समता मिळोनि जाये ॥ ३ ॥ निवृत्ति साकार वैकुंठींचें घर । देह हें मंदिर आत्मयाचें ॥४॥

१४८ दिननिशीं नाहीं अवघा दीपक । एका रूपें त्रैलोक्य बिंबलासे ॥ १ ॥ तें रूप सांगतां नये पैं भावितां । गुरुगम्य होतां एकतत्वें ॥ २ ॥ सांडावें पैं कोहं धरावें पैं सोहं । अनेकतत्वें बहु

एकतत्वें ॥ ३ ॥ निवृत्तिसधर एकतत्वी विचार । मनमार्ग साचार हरपला ॥४॥

१४९ चातकाचें धन मेघाचें जीवन । आम्हां नारायण तैसा सखा ॥ १ ॥ चकोरा अमृत चंद्रें जिववितें । भक्तांसि दुभतें हरि आम्हां ॥२॥ विश्रांतीसी स्थळ वैकुंठ सफळ । दुभतें गोपाळ कामधेनु ॥ ३ ॥ आशापाश नाहीं कर्तव्यता कांहीं । चिंतामणी डोहीं एकविध ॥४॥ समिरा सगट गति पावली विश्रांति । नामरूप जाति भेदशून्य ॥५॥ नामाची हे धणी तेचि हो पर्वणी । तृप्तातृप्त कृष्णीं होतु आम्हां ॥ ६ ॥ सांडिलों पैं द्वैतें दिधलें पै अद्वैतें । हरिविण रितें न दिसे आम्हां ॥७॥ निवृत्तिपरिवार मुक्तलग अरुवार । रत्नांचा सागर नामें बोळे ॥८॥

१५० निरशून्य गगनीं अर्क उगवला । कृष्णरूपें भरला कोंभ सरळू ॥ १ ॥ तें रूप सुंदर गौळियांचे दृष्टि । आनंदाची वृष्टि नंदाघरीं ॥ २ ॥ रजतमा बाळी दृश्याकार होळी । तदाकार कळी कृष्णबिंबें ॥३॥ निवृत्ति साकार शून्य परात्पर । ब्रम्ह हें आकार आकारलें ॥४॥

१५१ निरालंबसार निर्गुणविचार । सगुण आकार प्रगटला ॥१॥ तें रूप सुंदर शंखचक्रांकित । शोभतो अनंत यमुनातटीं ॥२॥ अपार उपाय आपणचि होय । सिद्धीचा न साहे खेलु सदा ॥ ३ ॥ सर्व हें घडलें कृष्णाचें सानुलें । घटमठ बुडाले इये रूपीं ॥ ४ ॥ सर्वसुखमेळे नामाकृति बोले । सिद्धीचे सोहळे कृष्णनामीं ॥ ५ ॥ निवृत्तितटाक घटमठ एक । कृष्ण हा सम्यकु नामरूपें ॥६॥

१५२ ज्या नाम अनंत न कळे संकेत । देवाचाही हेत हारपला ॥ १ ॥ तें रूप सानुलें यशोदे तान्हुलें । भोगितां निमाले भक्तजन ॥२॥ अनंत अनिवार नकळे ज्याचा पार । जेथें चराचर होतें जातें ॥३॥ निवृत्ति संकेतें अनंता अनंत । कृष्णनामें पंथमार्ग सोपा ॥४॥

१५३ विश्वाद्य अनाद्य विश्वरूप वंद्य । आणि हा अभेद भेद नाहीं ॥ १ ॥ तें रूप साजिरें नंदाचे गोजिरें । यशोदे निर्धारें

प्रेमसुख ।। २ ।। हारपली दिशा सृष्टीचा कवडसा । आपरूपें कैसा वोळलासे ।।३।। निवृत्तिसाधन वसुदेव खूण । गोपिकांचें धन हरि माझा ।। ४ ।।

१५४ खुंटलें साधन तुटलें बंधन । सर्वही चैतन्य एकरूप ।। १ ।। नाहीं तेथें माया नाहीं तेथें छाया । निर्गुणाच्या आया ब्रम्हरूप ।। २ ।। चैतन्य साजिरें चेतवी विचार । आपरूप धीरें विचरत ।। ३ ।। निवृत्ति म्हणे तें कृष्णरूप सर्व । रोहिणींची माव सकळ सृष्टी ।। ४ ।।

१५५ नामीं रूपीं गोडी ब्रह्मांडाएवढी । द्वैताची परवडी हारपली ।।१।। तें रूप सुंदर कृष्ण सुकुमार । सेविती सुरवर भक्तराज ।।२।। विराट अनंत ज्यामाजीं विरतें । नव्हेचि पुरतें शेषादिकां ।। ३ ।। निवृत्ति लक्ष्मी गरुड चिंतिती । तयांचिये मति आकळे हरि ।।४।।

१५६ निराकृति धीर नैराश्यविचार । परिपूर्ण साचार वोळलासे ।।१।। तें रूप सुंदर सुरस । तो पूर्णप्रकाश गोकुळीं रया ।।२।। नाना रूप हरपे दृश्यद्रष्टा लोपे । तो प्रत्यक्ष स्वरूपें नंदा घरीं ।। ३ ।। निवृत्ति सादर निराकार अंकुर । साकार श्रीधर गोपवेषें ।। ४ ।।

१५७ नित्य निर्गुण सदा असणें गोविंदा । सगुण प्रबंधामाजीं खेळे ।। १ ।। तें रूप सगुण अवघेंचि निर्गुण । गुणीं गुणागुण तया माजीं ।। २ ।। अनंत तरंगता अनंत अनंता । सृष्टीचा पाळिता हरि एकु ।। ३ ।। निवृत्तिपरिमाण अनंत नारायण । सर्वही चैतन्य आपरूपें ।।४।।

१५८ अनंत सृष्टिघटा अनंत नाममठा । परिमाण पैठा आत्मराम ।। १ ।। तें रूप साजिरें चतुर्भुजवेष । वैकुंठींचे लेख नंदभाग्य ।। २ ।। सिद्धीचें साधन चिंतामणि धन । कल्पवृक्ष घन वसती जेथें ।।३।। निवृत्तीचें मूळ गोपाळ सकळ । साधक दयाळ हरि होय ।।४।।

१५९ हिरण्यगर्भ माया अंडाकार छाया । ब्रह्म असे लया तेथें नेत ।। १ ।। तें रूप वैकुंठ जीवशीवपेंठ । मायेचा उद्धट छायासंगें

॥ २ ॥ मायाब्रम्ह हरि मातापिता चारी। जीवशिव शरीरीं एक नांदे ॥३॥ निवृत्तीची छाया जीवशिव माया। वासना संदेहा लया गेली ॥ ४ ॥

१६० पंचतत्वकळा सेविली संपूर्ण। त्याचेंही जीवन जनार्दन ॥ १ ॥ तो सोंवळा संपूर्ण अमृताचा घन। त्यामाजीं स्वजन हरि आत्मा ॥ २ ॥ नित्यता सोंवळा स्वयंपाकी शौच। नदिसे आमुचे आम्हां तेथें ॥ ३ ॥ निवृत्ति सोंवळा स्वयंपाकीं नित्य। नाम हें अच्युत जपतुसे ॥४॥

१६१ निरशून्यबिंबीं आकार पाहतां। आपण तत्वतां हरि एकु ॥ १ ॥ तें रूप सांपडे कृष्णमाजिवडे। सोंवळें उघडें शौच सदा ॥ २ ॥ तेथें वर्णव्यक्तिकल्पना हरपती। मनाच्या खुंटती गती जेथें ॥३॥ निवृत्तिनितंब सोंवळा स्वयंभ। प्रकाशलें बिंब चहूंकडे ॥४॥

१६२ निगम आगम वेदादिकां सम। श्रुतीचा उपक्रम हारपला ॥ १ ॥ तें रूप साजिरें नंदाचें गोजिरें। यशोदा श्रीधरें प्रेमभेटी ॥२॥ जेथें हे वाग्वाट शून्य तो निघोट। प्रत्यक्ष वैकुंठ ते गोपवेषें ॥३॥ निवृत्तितडाग निवांत सम्यक। सर्वरूपें एक आत्माराम ॥४॥

१६३ आदिमध्यवावो अवसान अभावो। पाहातां निर्वाहो हारपला ॥१॥ तें रूप माजिटें गोपवेषें खेळे। नंदाचे सोहळे पुरविले ॥२॥ धन्य ते यशोदा खेळवी मुकुंदा। आळवीत सदा नित्य ज्यासी ॥३॥ निवृत्ति सधर ब्रम्हरूपसार। वृतीचा विचार हारपला ॥४॥

१६४ जेथें रूपरेखा ना आपण आसका। सर्वरूपें देखा हरि माझा ॥१॥ तें रूप गोजिरें नंदाघरीं असे। जनीं वनीं दिसे गोपिकांसि ॥ २ ॥ नादभेदकळा जेथें भेद नुठी। ब्रम्हरूपें सृष्टि अवघी होय ॥ ३ ॥ निवृत्ति सज्जन जन वन देव। आत्मरूपभाव ब्रम्ह जाला ॥४॥

१६५ अव्यक्त आकार आकारलें रूप। प्रकाशस्वरूप बिंबलेंसे ॥ १ ॥ तें रूप अव्यक्त कृष्णनाम निज। नाम अधोक्षज चतुर्भुज

॥ २ ॥ वर्णासि अव्यक्त वर्णरूप व्यक्त । भोगिती विरक्त नाम पाठें ॥३॥ निवृत्तीचें काज नाम ब्रम्हबीज। गयनी सहज तुष्टलासे ॥ ४ ॥

१६६ मध्यबिंदनाद उन्मनीं स्वानंद । रूपस गोविंद गुणानिधि ॥ १ ॥ तें रूप सुरवर सेविती अरुवार। नित्यता सुविचार भोगिताती ॥ २ ॥ गौळियां गोजिरें दैवत साचारें। नंदासि एकसरें प्रेम देत ॥३॥ निवृत्ति निवाला प्रेमरसें धाला । सर्वसुखझेला हरिकृष्ण ॥ ४ ॥

१६७ विश्वातें ठेवूनि आपण निरंजनीं । नामाची पर्वणी भक्तालागीं ॥ १ ॥ तें रूप संपूर्ण वसुदेवाकुळीं। यादवां गोपाळीं वोळलासे ॥२॥ व्यापकपण धीर ब्रम्हांड साकार । तें रूप तदाकार भाग्ययोगें ॥ ३ ॥ निवृत्ति घनवट आपण वैकुंठ । कृष्णनामपेंठ गोकुळीं रया ॥४॥

१६८ विश्वंभरमूर्ती विश्वाचे पाळक । वैकुंठव्यापक जीवशिव ॥१॥ तें रूप सुंदर नंदाघरीं वसे । जनीं वनीं दिसे कृष्णरूप ॥२॥ निखळ निघोट नितंब परिपूर्ण । अनंदपूर्ण घन गोपवेषें ॥ ३ ॥ निवृत्तिपरिकर वैकुंठ अपार । भाग्य पारावार यशोदेचें ॥ ४ ॥

१६९ त्रिभंगी त्रिभंग जया अंगसंग। एकरूप सांग बोघवतें ॥ १ ॥ तें रूप सांवळें भाग्ययोगें वोळे । नंदाचे सोहळे पाळियेले ॥ २ ॥ श्रुतिप्रतिपाद्य शास्त्रांसि जें वेद्य । निर्गुणाचें आद्य भाग्यनिधि ॥ ३ ॥ निवृत्तिनितंब रूपस स्वयंभ। कृष्णनामें बिंब बिंबलेंसे ॥ ४ ॥

१७० ज्याचेनि स्मरणें कैवल्य सांडणें । एका नामें होणें चतुर्भुज ॥ १ ॥ तें रूप वैकुंठ भोगिती गोकुळीं । नंदाचिये कुळीं बाळकृष्ण ॥ २ ॥ नसंपडे ध्यानीं लावितां उन्मनी । तो गोपाळांचे कानीं सांगे मातु ॥ ३ ॥ निवृत्ति अरुवार कृष्णरूप सेवी । मन ठाण दवीं हृदयामाजीं ॥ ४ ॥

१७१ मन निवटलें ज्ञेय सांडवले । ठाणदिवीं केलें ध्यानालागीं ॥ १ ॥ उमटल्या ध्वनी कृष्णनामें ठसे । सर्व हृषीकेशें भरलें दिसें ॥ २ ॥ दिशाद्रुमध्यान हरपली सोय । अवघा कृष्ण होय ध्यानीं मनीं ॥ ३ ॥ निवृत्तिमाजीं घर मनाचा सुघडु । कृष्णची उपवडु दिसतसे ॥ ४ ॥

१७२ विकट विकास निवट रूपस । सर्व हृषीकेश दिसे आम्हां ॥१॥ तें रूप साजिरें नंदाचें गोजिरें । उन्मनी निर्धारें भोगूं आम्हीं ॥ २ ॥ विलास भक्तीचा उन्मेख नामाचा । लेशु त्या पापाचा नाहीं तेथें ॥ ३ ॥ निवृत्ति म्हणें तें सुखरूप कृष्ण। दिननिशीं प्रश्न हरि हरि ॥ ४ ॥

१७३ काळवेषें दुरि काळचक्र करीं । बाह्य अभ्यंतरीं हरि नांदे ॥१॥ सर्वत्र श्रीकृष्ण नंदाघरीं जाला । कृष्णें काला केला गोपवेषें ॥ २ ॥ गोपाळ संवगडे खेळे लाडें कोडें । यशोदेमायेपुढें छंदलग ॥ ३ ॥ निवृत्ति म्हणे तो स्वामी सकळांचा । दिनकाळ वाचा कृष्ण जपों ॥ ४ ॥

१७४ गगनाचिये खोपें कडवसा लोपे । क्षरोनिया दीपें दृश्यद्रष्टा ॥ १ ॥ तें वोळलें गोकुळीं वसुदेवकुळीं । पूर्णता गोपाळीं गोपीरंगीं ॥ २ ॥ जीवशिवसीमा नाहीं जेथें उपमा । हारपे निरोप मा तयामाजीं ॥ ३ ॥ निवृत्ति तत्पर वेदांचा ॐकार । ॐ तत्सदाकार कृष्णरूपें ॥ ४ ॥

१७५ गगनीं उन्मनी वेद होती मौनी । श्रुतीची काहाणी अरुती ठाके ॥ १ ॥ तें ब्रह्म सांपडे नंदाचिये घरीं । वनीं गाई चारी गोपवेषें ॥ २ ॥ न पाहातां होय ब्रह्मांडपीठिका । तें युग क्षणिका हारपे रया ॥ ३ ॥ निवृत्तिदैवत कृष्ण परिपूर्ण । सर्वत्र जीवन सर्वी वसे ॥ ४ ॥

१७६ गगनीं वोळलें ये तें देखिलें । दर्पणीं पाहिलें बिंबलेपण ॥ १ ॥ तें रूप रूपस रूपाचा विलास । नामरूपीं वेष कृष्ण ऐसे

॥२॥ सांडूनि घिटीव जालेंसे राजीव । सर्वत्र अवेव ब्रह्मपणें ॥३॥ निवृत्ति घडुला सर्वत्र बिंबला । दर्पणा वसरला आत्मबोधीं ॥ ४ ॥

१७७ क्षीराचा क्षीराब्धि क्षरोनियां लोटे । वैकुंठ सपाटे पाट् वाहे ॥ १ ॥ तें माये हरिरूप कृष्णरूप माझें । नेणिजे तें दुजे इयें सृष्टि ॥ २ ॥ सांडूनि उपमा गोकुळीं प्रगट । चतुर्भुजपीठ यमुनेतटीं ॥ ३ ॥ निवृत्ति निकरा वेणु ब्राहे धरा । यमुने स्थिरस्थिरा नादध्वनी ॥ ४ ॥

१७८ निरशून्य गगनीं अंकुरलें एक । ब्रह्मांडकवतुक लीळातनु ॥ १ ॥ तो माये वो हरि गोपिका भोगिती । शंखचक्राकृति कृष्णमूर्ति ॥ २ ॥ निराभास आस निःसंदेह पाश । तोचि हृषीकेश नंदाघरीं ॥ ३ ॥ निवृत्तिप्रकार ध्यानाचा विचार । सर्वही श्रीधर यशोदेचा ॥ ४ ॥

१७९ निरोपम गगनीं विस्तारलें एक । अनंत हे ठक गणना नाहीं ॥ १ ॥ तो माय सांवळा यमुनेचे तटीं । कृष्ण तो जगजेठी यशोदेचा ॥ २ ॥ निराकृति आकार अंकुर गोमटे । तो गोपिकांसी भेटे भाग्ययोगें ॥ ३ ॥ निवृत्ति संपन्न कृष्णरूपें ध्यान । गयनी तल्लीन नाम घेतां ॥ ४ ॥

१८० निराळ निरसी जीवशिवरसीं । सर्व ब्रह्म समरसीं वर्ते एक ॥ १ ॥ तें रूप परिकर कृष्णमूर्ति ठसा । गोपिकां कुवासा नंदाघरीं ॥ २ ॥ संसाराचें नारूं ठाणमाण दिसे । शामप्रभावसेत ये ब्रह्मीं ॥ ३ ॥ निवृत्ति घनदाट कृष्ण शामघन । योगीजनां ध्यान नित्यरूपें ॥ ४ ॥

१८१ निरासी निर्गुण नुमटे प्रपंच । विषयसुख साच नाहीं नाहीं ॥ १ ॥ तें रूप गोजिरें कृष्णमूर्ति ठसा । गोपाळ समरसामाजीं खेळे ॥२॥ चित्ताचे राहविते आपणचि द्रष्टे । नेतुसे वैकुंठें नाम घेतां ॥३॥ निवृत्तीसी ध्यान सर्व जनार्दन । वैकुंठ आपण गोपीसंगें ॥ ४ ॥

१८२ निरालंब देव निराकार शून्य । मनाचेंही मौन हारपलें ॥१॥ तें रूप सावडें शंखचक्रांकित । यशोदा ते गात कृष्णनाम ॥२॥ मौन्यपणें लाटे द्वैत हें न साहे । तें नंदाघरीं आहे खेळेमेळे ॥ ३ ॥ निवृत्ति आकार ब्रह्म परिवार । गोकुळीं साकार मूर्त ब्रह्म ॥४॥

१८३ दुजेपणा मिठी आपणचि उठी । कल्पना हे सृष्टी गाळूं पाहे ॥१॥ तें कृष्णरूप गाढें यशोदा घे पुढें । दूध लाडें कोडें मागतुसे ॥ २ ॥ सृष्टीचा उपवडु ब्रह्मांडाचा घडु । ब्रह्मींचा उपवडू उघडा दिसे ॥ ३ ॥ निवृत्ति उघड ब्रह्मामाजीं लोळे । नंदाघरीं खेळे गोपवेषें ॥ ४ ॥

१८४ अरूप बागडें निर्गुण संवगडें । खेळे लाडें कोडें नंदाघरीं ॥ १ ॥ तें रूप संपूर्ण यशोदा खेळवी । कृष्णातें आळवी वेळोवेळां ॥ २ ॥ सागर जीवन सत्रावीची खूण । मेघ तो वर्षण वोळलासे ॥ ३ ॥ निवृत्तीचें धन गोकुळीं श्रीकृष्ण । गयनीं सहिष्ण प्रेमें डुले ॥४॥

१८५ मेघ अमृताचा जेथूनि पवाड । दुजियाची चाड नाहीं तेथें ॥ १ ॥ तें रूप अरूप सुंदर सांवळें । भोगिती गोंवळे सुखसिंधु ॥ २ ॥ विराट नाटकु वैराज जुनाटु । गोपवेषें नटु नंदाघरीं ॥ ३ ॥ निवृत्ति सत्वर सेवी सुखसार । प्रकृति आकार लोपे ब्रह्मीं ॥ ४ ॥

१८६ वैभवविलास नेणोनि सायास । कल्पनेची आस नाहीं जेथें ॥ १ ॥ तें रूप दुर्लभ कृष्णमूर्तिठसा । वोतल्या दशदिशा नंदाघरीं ॥ २ ॥ योगियांचें ध्यान मनाचें उन्मन । भक्तांचें जीवन गायी चारी ॥३॥ निवृत्ति साकार ब्रह्मींचा प्रकार । ॐतत्सदाकार कृष्णलीला ॥४॥

१८७ तेथें नाहीं मोल मायाची गणना । आपण येसणा ब्रह्म घडु ॥ १ ॥ तें रूप साजिरें निर्गुण साकार । देवकीबिढार सेवियेलें ॥ २ ॥ न संपडे ध्याना मना अगोचर । तो गोपवेषधार गोकूळीं

रया ॥ ३ ॥ निवृत्ति धर्मपाठ गायनी विनट । कृष्णनामें पाठ नित्य वाचा ॥४॥

१८८ तिहींचे त्रिगुणें रजतम मिश्रित । त्यामाजीं त्वरित जन्म माझा ॥ १ ॥ पूर्वपुण्य चोख आचरलों आम्हीं । तरीच ये जन्मीं भक्ति आम्हां ॥ ३ ॥ शांति क्षमा दया निवृत्ति माउली । अखंड साउली कांसवदृष्टि ॥ ३ ॥ निवृत्ति म्हणे तेंचि गा जीवन मोल । भिवरा विठ्ठल दैवत आम्हां ॥४॥

१८९ खुंटले वेदांत हारपले सिद्धांत । बोलणें धांदांत तेंही नाहीं ॥१॥ तें रूप पाहतां नंदाघरीं पूर्ण । यशोदाजीवन कृष्णबाळ ॥२॥ साधिता साधन न पविजे खूण । तो बाळरूपें कृष्ण नंदाघरीं ॥ ३ ॥ निवृत्ति संपन्न सेवी गुरुकृपा । गयनीच्या द्विपा तारूं गेलें ॥४॥

१९० नसे तो ब्रह्मांडीं नसे तो वैकुंठीं । दुजियाची गोष्टी नाहीं तेथें ॥१॥ तें रूप सुंदर देवकीउदरीं । वसुदेवाघरीं कृष्ण माझा ॥२॥ ब्रह्मांडकडवा मनाचा वोणवा । साधितां राणिवा हारती ॥ ३ ॥ निवृत्ति सुंदर कृष्णरूप सेवी । गयनी गोसावी उपदेशिलें ॥४॥

१९१ सिद्धीचें साधन नेणती ते सिद्ध । अधिक उद्बोध आनंदाचा ॥ १ ॥ तें रूप सांवळें देवकीये लीळें । भोगिती सोहळे कृष्णरूपें ॥ २ ॥ उन्मनीं अवस्था लाविती ते मुनी । अखंड ध्यानीं मनीं कृष्णसुख ॥३॥ निवृत्ति ठकार श्रुतीचा कर । गोपाळ साकार आंकुरलें ॥४॥

१९२ नेणती महिमा ब्रह्मादिक भद्र । आणि ते महेंद्र नानास्थानीं ॥१॥ तें रूप खेळत गौळियांच्या संगें । पुंडलिका मागें भीमातीरीं ॥ २ ॥ उत्पत्ति उलथा नचले तो मार्ग । दुजियाचा संग नाहीं ज्यासी ॥३॥ निवृत्ति प्रगट गुरुमंत्र फळद । गोपाळ विद्गद ब्रह्म सेवी ॥ ४ ॥

१९३ गगनबाड दृष्टि सर्वतत्त्व शोखीं । जीवशिव पोखी कारणसिद्ध ॥ १ ॥ तेंचि हें सांवळें स्वरूप गोजिरें । कृष्णनाम खरें

नंदाघरीं ॥ २ ॥ पृथ्वीचें तळवट अनंत विराट। आपण वैकुंठ गोपीसंगें ॥ ३ ॥ निवृत्ति तत्पर लक्ष तें स्वानंद। नित्यता आनंद ब्रह्मानंदें ॥ ४ ॥

१९४ ग्रासूनि भानमान दृश्यद्रष्टा भिन्न। आपण चिद्घन वैकुंठीं रया ॥ १ ॥ तें रूप सखोल कृष्णरूपें खेळे। नंदयशोदेमेळें गोपीसंगें ॥ २ ॥ नित्यता प्रकाश सर्वपूर्णसार। आपण श्रीधर सर्वसुखें ॥ ३ ॥ तेंचि हें रूपडें कृष्णनाम पिकलें। यमुनें स्थिरावलें वेणूवातां ॥ ४ ॥ ज्योतिरूपें कीर्ण अनंत विस्तार। ब्रह्मांड आकार अनंत कोटी ॥ ५ ॥ निवृत्ति सोज्वळ नित्य नूतन सोय। आपणचि होय गोपरूपें ॥ ६ ॥

१९५ ज्ञानेंचि विज्ञान उन्मनीं निमग्न। दैतरूपें भग्न उरों नेदी ॥ १ ॥ तोचि हा गोपाळ गोपीसंगें खेळे। गोगोपाळमेळें नंदाघरीं ॥ २ ॥ दृश्यद्रष्टा सर्व तितिक्षा उपरती। श्रुतीसी संपत्ति येथें जाण ॥३॥ निवृत्ति सधर गोरक्षीं गयनीं। ब्रह्मरूपें पूर्णी समरसे ॥ ४ ॥

१९६ मंगलमांगल्या ब्रह्म हें सखोल। ब्रह्मरूपें खोल ब्रम्ह भोगी ॥ १ ॥ तें हें कृष्णनाम बोळलें त्या नंदा। आनंदें यशोदा गीतीं गात ॥ २ ॥ विश्वाद्य वेदाद्य श्रुतींसी अभेद्य। तें ब्रम्हपणें वंद्य ब्रम्ह भोगी ॥ ३ ॥ ॐकार मूर्धनि प्रणव प्रणम्य। वेदादि अगम्य आंगभूत ॥ ४ ॥ निराळें वैकुंठ निराकार धीट। निगम एकट ब्रम्हपणें ॥ ५ ॥ निवृत्तिपरिवार गुरु गयनी अमर। गोरक्षीं कंदर ब्रम्ह माझें ॥ ६ ॥

१९७ वर्णव्यक्तिसखे वर्णाश्रमसुखें। ब्रम्हनामें सौख्य योगीजना ॥ १ ॥ तें हें कृष्णनाम देवकी सबळ। वसुदेवकुळ गोपवेषें ॥ २ ॥ धर्म धरी धार धारणा धीट। निरालंबपीठ सौख्यशोभा ॥ ३ ॥ निवृत्ति सौभाग्य ब्रम्ह सर्व सांग। गुरुनामें पांग हरे एक ॥ ४ ॥

१९८ रूप मा अरूप रूपाचें रूपस। कांसवी डोळस निगमागमें ॥१॥ तो हा ब्रह्मामाजीं गोपाळ संगति। यशोदेहो प्रति दूध मागे

॥ २ ॥ जो रेखा अव्यक्त रेखेसीहि पर । दृश्यद्रष्टाकार सर्वाभूतीं ॥ ३ ॥ निवृत्तितटाक चक्रवाक एक । वासना सुश्लोक गुरुनामें ॥ ४ ॥

१९९ परेसी परता पश्यंती वरुता । मध्यमीं तत्त्वतां न कळे हरि ॥ १ ॥ तें हें कृष्णरूप गौळियांचें तप । यशोदेसमीप नंदाघरीं ॥ २ ॥ चोखट चोखाळ मनाचे मवाळ । कांसवीचा ढाळ जया नेत्रीं ॥ ३ ॥ निवृत्ति सर्वज्ञ गुरूची धारणा । ब्रह्म सनातनामाजीं मन ॥ ४ ॥

२०० निर्दोषरहित सर्वगुणीं हेत । द्वैतविवर्जित अरूप सदां ॥ १ ॥ तें रूप स्वरूप कृष्णबाललीला । माजीं त्या गोपाळा सदां वसे ॥ २ ॥ गुणागुणीं धीट वासना अविट । तद्रूप प्रगट निरंजन ॥३॥ विकार विवर्जित विवरण सोपें । अकार पैं लोपे एका नामें ॥ ४ ॥ निःसंवेह छंद वासनेचा कंद । ब्रह्माकारभेद नाहीं सदां ॥ ५ ॥ निवृत्तिपरिवार ब्रह्मरूप गोकुळीं । वृंदावन पाळी यमुनेतटीं ॥ ६ ॥

२०१ मथनीं मथन मधुरता आपण । विश्वीं विश्व पूर्ण सदोदित ॥१॥ तें हें चतुर्भुज मुगुटवर्धन । सुंदर श्रीकृष्ण खेळतसे ॥ २ ॥ द्रुम द्रुमपाणी द्रुमिलित ध्यानीं । दृढता निशाणी काष्टीं लागे ॥ ३ ॥ ध्रुवाद्य अढळ ब्रह्म हें अचळ । शोखी मायाजाळ निसंदेहा ॥ ४ ॥ क्लेशादि कल्पना क्लेशनिवारण । आपरूपें भिन्न होऊं नेदी ॥५॥ निवृत्ति कठिण गयनीप्रसाद । सर्वत्र गोविंद नंदाघरीं ॥६॥

२०२ पियूष पुरतें कांसवीतें वितें । संपूर्ण दुभतें कामधेनु ॥१॥ तेंचि हें डोळस सांवळें सुंदर । यशोदा सुकुमार बाळकृष्ण ॥ २ ॥ मधुर क्षारता माधवीं अखंड । दिनकाळ प्रचंड आत्माराम ॥ ३ ॥ निवृत्तीचें ताट पियूष पुरतें । कांसवीं दुभतें वाटितेंयेसि ॥४॥

२०३ नीट पाठ आम्हां धीट हा प्रबंध । जनश्रनबोध ब्रह्मरसें ॥ १ ॥ ते मेघःशाममूर्ति स्वरूप गोजिरी । गोकुळींची चोरी करी

कृष्ण ॥ २ ॥ मुद्गल शामळ नित्यता अढळ । अखंड अचळ स्वरूप त्याचें ॥ ३ ॥ निवृत्ति पुरता गुरुविवरण । गयनीची खूण आगमरूपें ॥ ४ ॥

२०४ निराकृते कृत्य विश्वातें पोखितें । आपण उखितें संर्घाकार ॥ १ ॥ तोचि हा सांवळा डोळस सुंदर । रुक्मिणीभ्रमर कृष्ण माझा ॥ २ ॥ निश्चळ अचळ नाहीं चळवळ । दिनकाळ फळ हारपती ॥ ३ ॥ निवृत्ति सोपान खेचर हारपे । तदाकार लोपे इये ब्रह्मीं ॥४॥

२०५ स्थिरधीरनीरसविचारसार । ब्रम्हांड आगर गोपवेषें ॥१॥ तो हा कृष्णसखा नंदाघरीं देखा । यशोदे सन्मुखा दूध मागे ॥२॥ कळिकाळ कळितां काळ आकळितां । आपण स्वसत्ता विश्व हरी ॥ ३ ॥ निवृत्तिनिकट ज्ञानदेव धीट । खेचरासी वाट गुरुनामें ॥ ४ ॥

२०६ सारासारधीर निर्गुणपरतें । सादृश्य पुरतें हरिनाम ॥१॥ तें हें कृष्णनाम यशोदेच्या घरीं । वनीं गायी चारी यमुनेतटीं ॥२॥ सुलभ सुभग आगम निगम । तो हा आत्माराम गोपवेषें ॥ ३ ॥ निवृत्तीचें पार गयनीचें गूज । मज मंत्रबीज उपदेशिलें ॥४॥

२०७ अकर्ता पैं कर्ता नाहीं यासी सत्ता । आपण तत्त्वतां स्वयें असे ॥ १ ॥ तें रूप चोखाळ कृष्णनामें बिंबें । यशोदा सुलभें गीतीं गाय ॥ २ ॥ व्योमाकार ठसा नभीं दशदिशा । त्यामाजीं आकाशा अवकाश होय ॥३॥ निवृत्ति म्हणे गुरु माझा पूर्ण ब्रम्ह । उपदेश सुगम कृष्णनाम ॥४॥

२०८ विश्रामधर्मता आश्रमपूर्णता । आपरूपकथा निमे जेथें ॥१॥ तें हें कृष्णबाळ गोपिकांसी खेळे । नंदाघरीं सोहळे आनंदाचे ॥ २ ॥ कथा त्या कथितां पूर्ण त्या मथितां । अरूप अच्युता सर्व असे ॥ ३ ॥ निवृत्ति समाधानीं कृष्ण हें चोखडें । मनोनिग्रहकोडें चरणीं गोंवी ॥४॥

२०९ धीराचें पैं धीर उदार तें पर । चोखाळ अमर अभेदपणें ॥ १ ॥ तें हें चतुर्भुज कृष्णरूप खेळे । त्यमाजीं गोपाळें छंद लग ॥ २ ॥ किडाळ परतें चोखाळ अरुतें । मीं माझें हें कर्तें तेथें नाहीं ॥ ३ ॥ निवृत्तिधर्मता विचार चोखाळ । सर्वत्र गोपाळ सखा आम्हां ॥४॥

२१० उपजे तें मरें मरें तें झुरें । जन्म येरझारें एकरूपें ॥१॥ तें हें कृष्ण नाम गोपीसंगें मेळें । नंदाघरीं सोहळे बाळक्रीडा ॥२ ॥ अमर अभरे अमरकंद खरे । होऊनि गोजिरें दूध मागे ॥ ३ ॥ निवृत्तिपरिचार सर्व हा गोपाळ । पूजूं दिनकाळ आत्माराम ॥४॥

२११ गोतवित्तधन मनाचें उन्मन । निमोनि संपूर्ण तयामाजीं ॥ १ ॥ जीवनपावन रसाचें निधान । रसरूपें धन रसनेचें ॥ २ ॥ भोग्यभोगभोक्ता आपण तत्वतां । त्याहूनि परता तयामाजीं ॥३॥ निवृत्तिआगर कृष्ण हें सागर । सर्वरूपें श्रीधर दिसतसे ॥४॥

२१२ देहाची दिवटी अखंड पैं सतेज । चंद्र सूर्य भोज नाहीं तेथें ॥ १ ॥ नाहीं तेथें रवि नाहीं तेथें चंद्र । अवघाचि महेंद्र एका तत्वें ॥२॥ दीपकेंचि दीपक विस्तार अनेक । अवघा त्रैलोक्य एका तत्वें ॥ ३ ॥ निवृत्ति संपन्न एका तत्वें सेवी । सर्वत्र गोसावी दिसे आम्हां ॥ ४ ॥

२१३ कल्पनाकाजळीं कल्पिलें कवळीं । कसेनि जवळी देवो होय ॥ १ ॥ टाकी हे कल्पना दुरितवासना । अद्वैतनारायणा भज कां रे ॥ २ ॥ मोहाच्या जीवनीं नको करूं पर्वणी । चिंति कां आसनीं नारायण ॥ ३ ॥ निवृत्ति आरुवारु कृष्णनाम पैं सारु । कल्पना साचारु हरि जाला ॥४॥

२१४ कल्पिलें तें कल्पिलें चित्त आकळिलें । तन्मय घोळिलें चैतन्याचें ॥ १ ॥ सांग मावें कैसें कल्पिलें कायसें । सर्व हृषीकेश दिसे आम्हां ॥२॥ निवृत्ति समरस सर्व हृषीकेश । ब्रह्मींचा समरस कल्पनेमाजीं ॥३॥

२१५ अचेत आत्मा चेतविला साचा। प्रबोध नामाचा रामनामीं ॥ १ ॥ हें सुख साचार निरंतर सर्वां। एकतत्वीं भावी आचरण ॥ २ ॥ निवृत्ति म्हणे आत्मा हाचि पैं विठ्ठल। नाहीं बहुसाल कर्मकांड ॥ ३ ॥

२१६ द्वैताची वाढी अद्वैत सुरवाडी। नामाची परवडी आम्हां घरीं ॥ १ ॥ नाम थोर आम्हां जपूं पैं साचार। विठ्ठलविचार हृदयामाजीं ॥२॥ निवृत्ति स्वानंदें विठ्ठलीं आनंद। नित्य परमानंद हृदयामाजीं ॥३॥

२१७ नाममंत्रसार नित्यनिरंतर। येणेंचि संसार तरे जाणा ॥ १ ॥ एकेविण दुजें नाहीं नाहीं सहजें। नाम मुखें भोजें घेईजेंसु ॥२॥ निवृत्ति म्हणे पारु विठ्ठल उच्चारु। तयाचा ससारु मोक्षरूप ॥ ३ ॥

२१८ मोक्षाचेनि देठें मोहपाश गिंळी। कैसेंनि गोपाळीं स्मरता होय ॥ १ ॥ मोहाचें मोहन चिंतितां श्रीहरि। बाहिजु भीतरीं अवघा होय ॥ २ ॥ दिननिशीं नाम जपतां श्रीहरीचें। मग या मोहाचें मोहन नाहीं ॥ ३ ॥ निवृत्ति आगम मोहनसाधन। सर्व नारायण एका तत्वें ॥४॥

२१९ तिमिरपडळें प्रपंच भासे। झांकोळला दिसे आत्मानाथ ॥१॥ हरिविण दुजे चिंतितां निभ्रांत। अवघेंचि दिसत मायाभ्रम ॥ २ ॥ सांडूनि तिमिर सर्व नारायण। हेंचि पारायण नित्य करा ॥ ३ ॥ निवृत्ति सज्जन अवघा आत्मराज। एकतत्वबीज जपालाहे ॥ ४ ॥

२२० प्रवृत्ति निवृत्ति या दोन्ही सहज। जनीं वनीं काज करुनी असती ॥ १ ॥ नारायणनाम जपतांचि दोन्ही। एकतत्वीं करणी सांगिजे गुज ॥ २ ॥ आशेचे विलास गुंफोनि महिमा। तत्वीं तत्वसीमा निजज्ञानें ॥ ३ ॥ निवृत्ति तत्वतां मनाचें मोहन। नित्य समाधान रामनामें ॥४॥

२२१ क्षमेचा विस्तार क्षेत्रज्ञवृत्ति । अवघी हे क्षिति एकरूप ॥१॥ शांति दया पैसे क्षमा जया रूप । अवघेंचि स्वरूप आत्माराम ॥ २ ॥ निंदा द्वेष चेष्टा या अभिमानभाजा । सांडूनियां भजा केशवासी ॥ ३ ॥ निवृत्ति तिष्ठतु एकरूपचित्त । अवघींच समस्त गिळियेलीं ॥४॥

२२२ आम्ही चकोर हरि चंद्रमा । आम्ही कळा तो पूर्णिमा ॥ १ ॥ कैसा वाहिजु भीतरीं हरि । बिंबें बिंबला एकसूत्रीं ॥२॥ आम्ही देहि तो आत्मा । आम्हीं विदेही तो परमात्मा ॥ ३ ॥ ऐक्यपणें सकळ वसे । द्वैतबुद्धि कांहीं न दिसे ॥४॥ निवृत्ति चातक इच्छि पां हे । हरिलागीं वरतें पाहे ॥५॥

२२३ आम्ही बोध तुम्ही बुद्धि । आम्ही स्वयें तुम्हीं शुद्धि ॥१॥ कैसा देहीं देह हरि । सर्व नांदे चराचरीं ॥२॥ आम्ही सोहं धरू भावें । तुवां हृदयींच ठसावें ॥ ३ ॥ निवृत्तिपाठपदा । नामें वैकुंठ सदा ॥४॥

२२४ साकारनिराकार ब्रह्मींचे विकार । येथील अंकुर गुरुराजे ॥ १ ॥ रज तम नाहीं सात्विक तेहि । परिपूर्ण देहीं आत्माराम ॥ २ ॥ सर्व घटवासीं सर्वत्र निवासी । आपण समरसीं त्रिब्रलासे ॥ ३ ॥ निवृत्तीची खूण गुरूचा उद्गार । सर्व हा निर्धार आत्माराम ॥ ४ ॥

२२५ नव्हे तें पोसणें नव्हे तें साधन । उपदेशखूण वेगळी रया ॥ १ ॥ न भेदे पालथें वज्रें मढियेलें । जीवन घातलें न भरे घटीं ॥ २ ॥ नाईके उपदेश नव्हे खूण सिद्ध । योनीसी प्रसिद्ध मढियेलें ॥ ३ ॥ निवृत्ति म्हणे जरी कृपा करी श्रीगुरु । तरीच हा संप्रधारु घरीं आम्हां ॥४॥

२२६ भरतें ना रितें आपण वसतें । सकळ जग होतें तयामाजीं ॥१॥ तें रूप पैं ब्रह्म चोखाळ सर्वदा । नित्यता आनंदा नंदाघरीं ॥२॥ आशापाश नाहीं घरीं पूर्णापूर्णों । सकळ जग होणें एक्यारूपें

॥ ३ ॥ निवृत्तितटाकरूप ब्रह्म एक । जेथें ब्रह्मादिक ध्याती सदा ॥ ४ ॥

२२७ सुमनाची लता वृक्षीं निपजली । ते कोणें घातली भोगावया ॥१॥ तैसा हा पसारा जगडंबर खरा । माजीं येरझारा शून्य खेपा ॥२॥ नाहीं त्यासी छाया नाहीं त्यासी माया । हा वृक्ष छेदावया विदान करी ॥ ३ ॥ निवृत्तिराज म्हणे गुरुविण न तुटे । प्रपंचसपाटें ब्रह्मीं नेम ॥४॥

२२८ छेदियेला वृक्ष तुटलें तें मूळ । प्रपंच समूळ उडोनि गेला ॥ १ ॥ गेलें तें सुमन गेला फूलहेतु । अखंडित रतु गोपाळीं रया ॥ २ ॥ सांडिला आकारु धरिला विकारु । सर्व हरिहरु एकरूपें ॥ ३ ॥ निवृत्तिनिधान वोळलें गयनी । अमृताची धणी आम्हां भक्तां ॥४॥

२२९ प्रपंच टवाळ वृक्षचि सकळ । उपडिलें मूळ कल्पनेचें ॥ १ ॥ गेली ते वासना निमाली भावना । चुकलें बंधन यमपाश ॥२॥ उपजत मूळ खुंटलें ते जाळ । मायेचें पडळ हारपले ॥ ३ ॥ निवृत्ति स्वानंद नित्यता आनंद । जन हा गोविंद आम्हां पुरे ॥४॥

२३० तुटलें पडळ भेटला केवळ । सर्व हा गोपाळ गुरुमुखें ॥१॥ न देखों बंधन सर्व जनार्दन । व्यासादिकीं खूण सांगितली ॥ २ ॥ ब्रह्मांडविवरण हरीचा खेळ । त्यांतील हा वेळ तोडियेला ॥ ३ ॥ निवृत्ति बोधला गुरुखुणा बोध । मनाचा उद्बोध हरिचरणीं ॥४॥

२३१ खुंटलें तें मन तोडियेली गति । वेळु तो पुढती तोडियेला ॥ १ ॥ जाहालें उन्मन विरालें तें मन । श्रीरामचरण पुरे आम्हां ॥ २ ॥ गेलें मन रामीं निष्काम कल्पना । बुडाली वासना तिये डोहीं ॥३॥ धन्य ते चरण नित्यता स्मरण । अखंड संपन्न प्रेम देतु ॥४॥ अमृतकुपिका अमृताचा झरा । पाटु येकसरा वाहातसे ॥५॥ निवृत्तीची वृत्ति प्रेमेंचि डुल्लत । मन तें निश्चित रामपायीं ॥६॥

२३२ गोंविलें चरणीं टाकिलें रांडवणीं । विषयपाखरणी दुरी ठेली ॥ १ ॥ पाहाट पाहाली ब्रह्म उगवली । दिननिशी जाली

एकरूप ॥ २ ॥ नाहीं तारा ग्रह नाहीं ते मेदिनी । सर्व जनार्दनीं बिबलेंसे ॥ ३ ॥ निवृत्तिनिकट ब्रह्म सर्व घट । अवघाचि निघोट राम आम्हां ॥४॥

२३३ मारुनि कल्पना निवडिलें सार । टाकिलें असार फलकट ॥१॥ धरिला तो हरि गोंविलेंसे सर्व । विषयाची माव झाडियेली ॥२॥ पहातें दुभतें कासवी भरितें । नेत्राते करितें तृप्त सदा ॥३॥ निवृत्ति अमृत गुरुकृपा तुषार । सर्व हा विचार हरि केला ॥ ४ ॥

२३४ आमचा आचार आमचा विचार । सर्व हरिहर एकरूप ॥ १ ॥ धन्य माझा भाव गुरूचा उपदेश । सर्व हृशीकेश दावियेल ॥ २ ॥ हरिविण दुजें नेणें तो सहजें । तया गुरुराजें अर्पीयेलें ॥३॥ हरि हेंचि व्रत हरि हेचि कथा । हरिचिया पंथा मनोभाव ॥ ४ ॥ देहभाव हरि हरि सर्वत्र स्वरूप । एक्या जन्में खेप हरिली माझी ॥५॥ निवृत्ति हरि प्रपंचबोहरी । आपुला शरीरीं हरि केला ॥६॥

२३५ परिपूर्ण ब्रह्म विज्ञानेंसि ज्ञान योगियाचें ध्यान आत्म-ज्योति ॥ १ ॥ आत्मारामसार दृश्यद्रष्टाविचार । नामसंकेतधीर निरंतर ॥ २ ॥ ध्येयाचें पैं ध्यान मनाचें उन्मन । भक्तासी पावन वैकुंठींचें ॥ ३ ॥ निवृत्ति म्हणे भक्ता स्वानंदजीवन । ब्रम्ह सनातन सर्वांघटीं ॥ ४ ॥

२३६ व्योमामाजीं तारा असंख्य लोपती । तैसे लक्षुमीपतीं-माजी विरे ॥ १ ॥ धन्य दिवस नित्य सेवूं श्रीरामास । जनवन समरस पूर्णबोधें ॥ २ ॥ तारा ग्रहदिन त्यामाजीं उन्मन । प्रपंचाचें भान दुरी ठेलें ॥ ३ ॥ निवृत्ति निमग्न नाम सेविताहे । ब्रम्हपणें होय सदोदीत ॥ ४ ॥

२३७ त्रैलोक्यपावन जनीं जनार्दन । त्यामाजीं परिपूर्ण आत्म-ज्योति ॥ १ ॥ नाहीं आम्हां काळ नाहीं आम्हां वेळ । अखंड सोज्वळ हरि दिसे ॥ २ ॥ ब्रम्ह सनातन अः हींचे अंकुर । भक्ति-पुरस्कर भूतदया ॥ ३ ॥ निवृत्ति म्हणे दीन दुर्बळ मी एक । मनोमय चोख आत्मा गोड ॥ ४ ॥

२३८ धन्य हा खेचर धन्य हा सोपान। भक्तीचें जीवन जनकहेतु ॥ १ ॥ धन्य याचें कूळ पवित्र सकळ। नित्य या गोपाळ जवळीं असे ॥ २ ॥ याचेनि स्मरणें नासतीं दारुणें। कैवल्य पावणें ब्रम्हामाजीं ॥ २ ॥ निवृत्ति म्हणे परब्रम्ह हें साकार। तेथील अंकुर उमटले ॥ ४ ॥

२३९ सर्वांघटीं वसे तो आत्मा प्रकाशें। प्रत्यक्ष आम्हां दिसे गुरुकृपा ॥ १ ॥ विरालें तें ध्येय ध्यान गेलें मनीं। मनाची उन्मनी एक जाली ॥ २ ॥ ठेला अहंभाव सर्व दिसे देव। निःसंदेह भाव सदा आम्हां ॥ ३ ॥ निवृत्तिसाधनगयनी प्रसादें। सर्व हा गोविंद सांगतुसे ॥ ४ ॥

२४० सर्व हरि दिसे जनीं वनीं वसे। भव दृश्य भासें भक्तजनां ॥ १ ॥ ऐसें कांहीं करा सहज तें आचरा। जन्मभरोवरा पडों नका ॥ २ ॥ भावना श्रीधर भाविक हरिहर। भजनीं श्रीवर सर्व तुष्टे ॥ ३ ॥ निवृत्तिनिधान आम्हां हा जीवन। भावयुक्त घन पावे पावे ॥ ३ ॥

२४१ मातापिता नाहीं बंधु बोध कांहीं। सम सर्व डोहीं वर्तताति ॥ १ ॥ सर्व आत्माराम भजनीं निष्काम। दिनकाळ नेम भजनशीळ ॥२॥ दया वसे देहीं क्षमा ते माधवीं। कासवी शोभवी जनीं इये ॥ ३ ॥ निवृत्ति म्हणे ऐसा गयनी सद्‌गुरु। उपदेशपूर अमृताचा ॥ ४ ॥

२४२ पूर्ण बोधें धाले आत्माराम जाले। निखळ बोतले पूर्णसत्वें ॥ १ ॥ पूर्णपुण्य चोख आम्हां स सफळ। गयनीकल्लोळतुषार आम्हां ॥ २ ॥ चंद्रसूर्यकीर्ण आकाश प्रावर्ण। पृथ्वी अंथरुण सर्वकाळ ॥ ३ ॥ निवृत्ति म्हणतो गुरु धडफुडा। ब्रम्हांडाएवढा अनंत माझा ॥ ४ ॥

२४३ आम्हां जपनाम गुरुखूण सम। जनवन धाम गुरूचेंचि ॥ १ ॥ नेघों कल्पना न चढों वासना। एका पूर्णघना शरण जाऊं

॥ २ ॥ तप हें अमूप नलगे संकल्प । साधतां समीप जवळीं असे ॥ ३ ॥ निवृत्ति म्हणे मज निरोपिलें धन । हेचि ब्रम्हखूण जाणिजेसु ॥ ४ ॥

२४४ आम्हां हेंचि थोर सद्‌गुरु विचार । नलगे संप्रधार नानामतें ॥ १ ॥ नेघों तें काबाड न करूं विषम । ब्रम्हांड हें नेम आम्हां राम ॥ २ ॥ नेदूं यासी दुःख उन्मनीचें सुख । नकरूं हा शोक आला गेला ॥ ३ ॥ निवृत्ति म्हणे आम्हां सद्‌गुरुउपदेश । सर्वभूतीं वास हरि आहे ॥ ४ ॥

२४५ चराचरीं हरि गुरुमुखें खरा । माजीं ब्रम्ह सैरा विचरों आम्हीं ॥ १ ॥ आम्हां ऐसें व्हावें तरीच हें भोगावें । निरंतर ध्यावें पोटाळुनी ॥ २ ॥ नाहीं येथें काळ अवघें शून्यमय । निर्गुणें सामाये तनू माजीं ॥ ३ ॥ निवृत्ति म्हणे पर त्रिकूटगोल्हाट । त्यावरील नीट वाट माझी ॥ ४ ॥

२४६ परम समाधान परमं वर्धन । नाम जनार्दन क्षरलें असे ॥ १ ॥ अक्षर अनंत क्षर हा संकेत । मागुतें भरत आपण्यामाजीं ॥ २ ॥ आपण क्षरला आपण उरला । वैकुंठीं वसिन्नला चतुर्भुज ॥३॥ निवृत्तिगुरु गयनी सांगतसे हरी । नाम चराचरीं विस्तारलें ॥ ४ ॥

२४७ हरि आत्मा होय परात्पर आलें । नाम हें क्षरलें वेदमतें ॥ १ ॥ वेदांतसिद्धांत नाही आनुहेत । सर्वभूतीं हित हरि आहे ॥ २ ॥ हरिविण न दिसे गुरू सांगतसे । हरि हा प्रकाशे सर्वरूपीं ॥ ३ ॥ निवृत्ति कोंदलें सद्‌गुरुनीं दिधलें । हरिधन भलें आम्हां-माजीं ॥ ४ ॥

२४८ विस्तार हरीचा चराचर जालें । त्यामाजीं सानुलें गुरु-दैवत ॥१॥ गुरुविण व्यर्थ विज्ञान न संपडे । ज्ञानहेतूकडे हिंडणें व्यर्थ ॥२॥ गुरु परब्रम्ह गुरु मातापिता । गुरुविण दैवत नाहीं दुजें ॥३॥ निवृत्ति म्हणे मज गुरुबोधचिठी । भक्तिनामपेटी उघडिली ॥४॥

२४९ साधकबाधक न बाधी जनक । सर्व हरि एक आम्हां ऐसे ॥ १ ॥ हरिविण नाहीं हरिविण नाहीं । हरि हाचि पाही एकरूप ॥ २ ॥ हरीमाजीं जन हरीमाजीं वर्न । हरि हा निर्गुण सर्वां ठायीं ॥ ३ ॥ निवृत्ति हरिलीळा दिनकाळ फळला । निमिषो निमिष कळा हरि जाणें ॥ ४ ॥

२५० नाहीं छाया माया प्रकृतीच्या आया । मनाच्या उपाया नचले कांहीं ॥१॥ तें रूपस्वरूप अपार अमूप यशोदेसमीप खेळतसे ॥ २ ॥ विश्वाचा विश्वास विश्वरूपाधीश । सर्वत्र महेश एकरूपें ॥३॥ निवृत्ति सर्वज्ञ नाममंत्रयज्ञ। सर्व हाचि पूर्ण आतमाराम ॥४॥

२५१ प्रतिपाळ सम प्रतिज्ञेचा नेम । सर्वज्ञतातम गिळीतसे ॥१॥ तें रूप सकुमार गोपवेषधर । सर्वज्ञ साचार नंदाघरीं ॥२॥ त्रिपुर उदार सर्वज्ञता सूत्र । नामरूपपात्र भक्तीलागीं ॥ ३ ॥ निवृत्तिसंपदा सर्वज्ञ गोविंदा । सूत्रमणी सदा तेथें निमो ॥ ४ ॥

२५२ निकट वेल्हाळ नेणों मायाजाळ । विव्हळ पाल्हाळ नेणों कांहीं ॥ १ ॥ तें रूप श्रीधर मानवी आकार । सर्व निराकार सिद्धि बोळे ॥ २ ॥ कुटुंब आचार कुळवाडी साजार । सर्व हा श्रीधर एकएके ॥ ३ ॥ निवृत्ति निमग्न गयनीची प्रज्ञा । नामें कोटियज्ञां होत जाय ॥ ४ ॥

२५३ ज्ञानेंसि विज्ञान रूपेंसि सज्ञान । ध्यानेंसि धारणा हारपली ॥ १ ॥ तें रूप संपूर्ण बोळलें हे खूण । नंदासी चिद्घन वर्षलासे ॥ २ ॥ अरूपस्वरूप लक्षितां पै माप । नंदा दिव्या दीप उजळला ॥ ३ ॥ निवृत्ति संपूर्ण नाम .नारायण । सच्चिदानंदघन सर्व सुखी ॥ ४ ॥

२५४ आदिरूपसम मूळप्रकृतिनेम । वैकुंठ उत्तम सर्वत्र असे ॥ १ ॥ तें रूप संपूर्ण बोळलें परिपूर्ण । सर्व नारायण गोपवेषें ॥२॥ आधारीं धीरता निर्धारीं धरिता । सर्वत्र पुरता एकरूपें ॥३॥ निवृत्तिसाधन सर्वरूपें जाण । एकरूपें श्रीकृष्ण सवितसे ॥ ४ ॥

२५५ वैकुंठ कैलास त्यांमाजीं आकाश। आकाशीं अवकाश धरी आत्मा ॥ १ ॥ तें रूप सुघड प्रत्यक्ष उघड। गौळियांसी कोड कृष्णरूपें ॥ २ ॥ न दिसे निवास आपरूपें दिशा। सर्वत्र महेशा आपरूपें ॥ ३ ॥ तारक प्रसिद्ध तीर्थ पैं अगाध। नामाचा उद्‌बोध नंदाघरीं ॥ ४ ॥ प्रकाशपूर्णता आदिमध्यसत्ता। नातळे तो द्वैता अद्वैतपणें ॥ ५ ॥ निवृत्तिसाधन कृष्णरूपें खूण। विश्वीं विश्व पूर्ण हरि माझा ॥ ६ ॥

२५६ मृगजळाभासलहरी अपार। हा प्रपंचपसार उदरीं जया ॥१॥ तें रूप वैकुंट कृष्णरूपें खेळे। गोपाळांचे लळे यमुने तटीं ॥२॥ जाळूनि इंधन उजळल्या दीपीं। अनंतस्वरूपीं एक पिसे ॥ ३ ॥ निवृत्तिसागर ज्ञानार्क आगर। कृष्णचि साचार बिंबलासे ॥४॥

२५७ जाणोनि नेणतें नेणत्या मागतें। आपण पुरतें नित्यपूर्ण ॥ १ ॥ तें स्वरूप कृष्ण गोळियांच्या भाग्यें। नंदासी सौभाग्यें भागा आलें ॥२॥ जाण तें पूर्णता पूर्ण तें समता। आपण चित्सत्ता गोपवेषें ॥ ३ ॥ निवृत्ति परिमाण सर्वपूर्णघन। दिन निशीं कृष्ण भाग्ययोगें ॥ ४॥

२५८ विश्वाचा चालक सूत्रधारी एक। विज्ञान व्यापक ज्ञान-गम्या ॥ १ ॥ तें रूप साजिरें कृष्णघनःशाम। योगितां परम जप ज्याचा ॥ २ ॥ शिवशिवोत्तम नाम आत्माराम। जनवनसम गोप–वेषें ॥ ३ ॥ निवृत्तिचाळक सर्वक व्यापक। आपरूपें एक सर्वत्र असे ॥४॥

२५९ गोतवित्तचित्त गोतासी अचूक। चाळकपंचक तत्वसार ॥ १ ॥ तें रूपसादृश्य कृष्णनाम सोपें। नंदायशोदे देखीं बाळलीला ॥ २ ॥ निरसूनि गुण उगवली खूण। गोकुळीं श्रीकृष्ण खेळे कैसा ॥ ३ ॥ निवृत्तिचें सार कृष्णनामें पार। सर्व हा आचरा हरि हरि ॥४॥

२६० जेथें रूपरेखा नाहीं गुण देखा। चिदाकाश एका अवतरला ॥ १ ॥ तें रूप गोजिरें कृष्णरूपें सांग। यशोदेचा पांग हरियेला

॥२॥ जेथें रजतम नाहीं तें निःसीम ।' आप शमदम पूर्णघन ॥३॥ निवृत्तीचें सार ब्रह्ममुख घन सर्व जनार्दन गोपवेषें ॥४॥

२६१ कारणपरिसणा कामधामनेम । सर्व आत्माराम नेमियेला ॥ १ ॥ तें रूप सुंदर सर्व अगोचर । कृष्णपरिकर गोपवेषें ॥ २ ॥ वेदादिककंद ॐकारउद्बोध । साकार प्रसिद्ध सर्वांघटीं ॥ ३ ॥ निवृत्ति म्हणे धाम कृष्ण हा परम । सौख्यरूपें सम वर्ततसे ॥ ४ ॥

२६२ आद्यरूपसार जेथूनि ॐकार । तो प्रणव साचार हारपला ॥ १ ॥ तें रूप समर्थ रामकृष्णनाथ । गोपिका कृतार्थ नाम घेतां ॥२॥ ब्रह्मांड घडले अनंत घटमठ । आदरूपें धीट मुनिजना ॥ ३ ॥ निवृत्तीचें सार सर्व हा परिकर । कृष्णचि साचार बिंबलासे ॥४॥

२६३ व्याप्तरूपें थोर व्यापक अरूप । दुसरें स्वरूप नाहीं जेथें ॥ १ ॥ तें अव्यक्त साबडें कृष्णाचें रूपडें । गोपाळ बागडें तन्मयता ॥ २ ॥ उन्मनी माजिटें भोगिती जे मुनी । मूर्तीची पर्वणी हृदयीं वसे ॥३॥ निवृत्तिकारण कृष्ण हा परिपूर्ण । यशोदा पूर्णघन-वोळलेंसे ॥ ४ ॥

२६४ अनंत रचना हारपती ब्रह्मांगें । हेळाचि वितंडें मोडीतसे ॥१॥ तें रूप राजस वसुदेव भोगी । देवकियेलागीं वोळलेंसे ॥२॥ विचित्र रचना ब्रह्मांडकूसरीं । निरालंब हरि गोकुळीं वसे ॥ ३ ॥ निवृत्तिसंपदा गाताती गोविंदा । भोगिती मुकुंदा निजबोधें ॥ ४ ॥

२६५ रसज्ञ साचार सामाजीं वसे । जीवन हें सोसे असोस होय ॥ १ ॥ तें रूप स्वरूपाचें रूपींचा वोळलें । कंदर्पें घोळिलें नंदाघरीं ॥२॥ नाहीं त्या आकार अवघाचि वैकुंठ । अद्वैत घनदाट ब्रह्ममय ॥ ३ ॥ निवृत्तिनितंब कृष्ण तो स्वयंभ । श्रीमूर्तीचें बिंब दिसे सर्व ॥ ४ ॥

२६६ जयामाजीं दीक्षा हारपोनि जाये । द्वैत हेंहि ठाये दुजेपणें ॥१॥ तें रूप रोकडें दिसे चहूंकडे । गोपाळ सवंगडे खेळताती ॥२॥

उपरति योगियांतितिक्षा हारपे। मायाकार लोपे कृष्णध्यानें ॥३॥ निवृत्ति तत्पर सर्व हा श्रीधर। मनाचा विचार हारपला ॥ ४ ॥

२६७ आम्हीं किरण तूं सूर्यो। आम्हीं अस्तु तूं उदयो ॥ १ ॥ कैसा देहीं देवो दिवटा। परापश्यंती चारी वाटा ॥ २ ॥ आम्हीं कळा तूं चंद्रमा। तूं अमृत आम्ही गरिमा ॥ ३ ॥ आम्हीं निधि तूं निधान। आम्हीं ध्येय तूं साधन ॥ ४ ॥ निवृत्ति उपरती वाहे। हृदयीं कृष्णनाम ध्यायें ॥ ५ ॥

२६८ ज्याचें मुखीं नाम अमृतसरिता। तोचि येकु पुरता घटु जाणा ॥ १ ॥ नामाचेनि बळें कळिकाळ आपणां। ब्रम्हांडा येसणा तोची होय ॥२॥ न पाहे यमकाळ तयाकडे अवचितां। हरिनामाची सरिता ज्याचें मुखीं ॥ ३ ॥ निवृत्ति नामामृत उच्चारी रामनाम। नित्यता परब्रह्म याचें घरीं ॥ ४ ॥

२६९ नित्य नाम वाचे तोचि एक धन्य। त्याचेचि शुद्ध पुण्य इये जनीं ॥ १ ॥ रामनामांकित नित्य मंत्र वाचे। दहन पापचें एक्या नामें ॥ २ ॥ ऐसा जो नित्यतां पढतसें नाम। नाहीं तयासम दुजें कांहीं ॥ ३ ॥ निवृत्ति अव्यक्त रामनाम जपे। नित्यता सोहंपे रामनाम ॥४॥

२७० अखंड जपतु नाममंत्र वाचे। त्याहूनि दैवाचे कोण भूमीं ॥ १ ॥ अमृतीं राहिला त्यासि कायसें मरण। नित्यता शरण हरिचरण ॥ २ ॥ नाममंत्रराशी अनंतपुण्य त्यासी। नाहीं पैं भाग्यासी तयाहुनी ॥ ३ ॥ निवृत्ति म्हणे सार रामनाममंत्रु। कैचा त्याशी शत्रु जितो जनीं ॥४॥

२७१ नाम नाहीं वाचे तो नर निर्दैव। कैसेनी देव पावेल तया ॥ १ ॥ जपे नाम वाचे रामनामपाठें। जाशील वैकुंठें हरि म्हणतां ॥ २ ॥ न पाहे पैं दृष्टीं कळिकाळ तुज। रामनाममंत्रबीज मंत्रसार ॥ ३ ॥ निवृत्ति म्हणे नाम जपावें नित्यता। आपणचि तत्वतां होईल हरि ॥ ४ ॥

२७२ नामाचेनि बळें तरिजे संसार । आणिक विचार करूं नको ।। १ ।। नाम जप वेगीं म्हणें हरि हरि । प्रपंच बोहरी आपें आप ।। २ ।। नित्यता भजन देवद्विज करी । नाम हें उच्चारी रामनाम ।। ३ ।। निवृत्ति जपतु रामनाम वाचे । दहन पापाचें आपें आप ।। ४ ।।

२७३ नलगे मंत्रसार नलगतीं तपें । रामनाम सोपें मूळमंत्र ।। १ ।। रामनाममंत्र जप तूं रे जना । तुटेल यातना भवमूळ ।। २ ।। ज्याचेनि स्मरणें तरली पै गणिका । वैकुंठलोका प्राप्त जाली ।। ३ ।। निवृत्ति म्हणे नाम हेंचि सारतप । जप का अमुप निरंतर ।। ४ ।।

२७४ वेगु करि मना धरावें पें सार । नामचि आचार रामनामें ।। १ ।। तरसी रे मना स्मरतां नामावळी । राहसी अढळीं वैकुंठीं रया ।। २ ।। सार तेंचि धरि असार तें निवडी । वैकुंठ चढावढी रामनामे ।। ३ ।। निवृत्ति म्हणे सिद्ध असतां पैं मंत्रु । रामनामें शत्रु नासतील ।। ४ ।।

२७५ नामाचेनि स्मरणें नित्यता पारणें । तेंचि विठ्ठलनामनाणें पंढरिये ।। १ ।। विठ्ठल विठ्ठल मंत्र हेंचि निजशास्त्र । विचारितां सर्वत्र दुजे नाहीं ।। २ ।। नामेविण मूर्ख नित्य पैं तया दुःख । नामें शुकमुख नित्य सदा ।।३।। निवृत्तिचें जाप्य विठ्ठलनामपाठ । ऐका नामें पाप कोटि जाये ।। ४ ।।

२७६ ज्ञानघनमुक्ति विज्ञानघनसंपन्न । सर्वघटीं चैतन्य हरि नांदे ।।१।। त्या रूपें मोहिलें काय करूं साजणी । अखंड उन्मनी लागे त्यासि ।।२।। समाधिसंजीवन कृष्णाचें पै ध्यान । दिननिशि मनीं रूप दिसे ।।३।। निवृत्ति घनवट स्वामी माझा दिसे । येकतत्त्व पैसें शोभतुसे ।। ४ ।।

२७७ श्यामाची श्याम सेज वरी करी परवस्तुची भेटी । ऐसा तोचि सद्गुरु रे ।। १ ।। सद्गुरुवीण मूढासि दरुशन कैचें । ऐसा

तोचि तो चमत्कारु गे बाईये ।। २ ।। एक मंत्र उपदेशिती गुरु ते जाणावे भूमीभारु ।। ३ ।। निवृत्ति म्हणे तत्व साक्षत्वें दावी । ऐसा तोचि चमत्कारु गे बाईये ।।४।।

२७८ रामनाम नित्य अखंड पै चित्तीं । तयाचे पुरती सर्व काम ।। १ ।। रामरामनामें तुटती संसार । नाहीं त्या येरझार योमाळे ।। २ ।। हरिध्यान आम्हां हाचि मंत्र थोर । नकरीं विचार अन्यशास्त्रीं ।। ३ ।। निवृत्ति अखंड जपतुसे नाम । हृदयीं सप्रेम मूर्ति त्याची ।। ४ ।।

२७९ मन गेलें देवीं ध्यान गेलें रूपीं । राहिलें स्वरूपीं तल्लीन देखा ।। १ ।। सुखदुःख नाहीं सुखदुःख नाहीं । नाम मात्र पाहीं हरि बोळे ।। २ ।। येकतत्वसार रामनामसुख । नलगे ते भूक प्रपंचाची ।। ३ ।। निवृत्ति सत्वर उच्चारण नाम । वैकुंठ हें धाम तया देहीं ।। ४ ।।

२८० आशापिपासा नेघों पै चित्तीं । एका नामें तृप्ति सर्वकाळ ।।१।। राम राम नाम आम्हांसी अखंड । नेणों पै पाषांड नानामतें ।। २ ।। हरिनाम वाचे सारमंत्र आम्हां । अखंडित प्रेमा वसे चित्तीं ।।३।। निवृत्तिसंचित गैनी पैं सांगे । एकाचि श्रीरंग जोडी करा ।।४।।

२८१ नाम मुखीं सदां तोचि पै भाग्याचा । तयासि यमाचा धाक नाहीं ।। १ ।। रामनाम हरि सर्वकाळ वसे । तेथेंचि निवासें वसे हरि ।।२।। हरिध्यान वसे अखंड पैं सर्वदां । नपवे तो आपदा इये जनीं ।। ३ ।। निवृत्तिसमता हरिभजन करी । सर्वत्र कामारी ऋद्धिसिद्धि ।। ४ ।।

२८२ जनीं जनार्दन हाचि भावो दृढ । अवघेंचि गूढ तारी जना ।।१।। जडमूढ तरती हरिनामछंदें । एका नामपदें वैकुंठ रया ।। २ ।। सत्वर उच्चार रामनाम चित्तीं । संसारखंती नाहीं तया ।।३।। निवृत्ति सत्पद इच्छित सर्वदां । भिन्नभेद कदां नाहीं चित्तीं ।। ४ ।।

२८३ हरिप्रेम नित्य ज्यासि पैं सदां वसे। सर्वघटीं दिसे हरि आम्हां ॥ १ ॥ रामकृष्णमाळ नित्य जप करी। तयासि संसारीं सुख आहे ॥ २ ॥ अंतींचिये वेळे रामनाम जोडी। वैकुंठ परवडी तया नरा ॥३॥ निवृत्ति अखंड हरिध्यान चित्तीं। संसारसमाप्ति जाली तया ॥ ४ ॥

२८४ समता वर्तावी अहंता खंडावी। तेणेंचि पदवी मोक्षमार्ग ॥१॥ क्षमा धरी चित्तीं अखंड श्रीपति। एकतत्त्व चित्तीं ध्याईजेसु ॥२॥ नाम हाचि मंत्र नित्य नामें सार। दुसरा विचार घेऊं नको ॥३॥ अन्य शास्त्रें भजतां नाहीं पैं मुक्तता। हरिनाम गातां मुक्ति रोकडी ॥४॥ नित्य सुख घ्यावें नामचि अनुभवावें। तरीच सुख पावे इहलोकीं ॥ ५ ॥ निवृत्ति भजन नित्य अनुष्ठान। एकरूपें ध्यान मन ध्यातु सदा ॥६॥

२८५ आकारनिडळीं साकारमंडळीं। एकु वनमाळी क्षरलासे ॥ १ ॥ पंचब्रह्मछाया पंचब्रह्ममाया। एकु जाये विलया एकासंगें ॥२॥ ऐसिये तत्वें होताति परत्वें। धरूनियां सत्व अहंभाव ॥३॥ निवृत्ति दिवटा उमगूनियां वाटा। पंढरी चोहटा। देखिला हरि ॥ ४ ॥

२८६ अवीट अबोला घेतां पैं नेमोला। तो प्रत्यक्ष देखिला भीमातटीं ॥ १ ॥ अव्यक्त साकार आकारलें अंकुर। क्षरलें चराचर भक्तिकाजें ॥२॥ अनुमान विटे सर्वघटीं माजिटें। तें परब्रह्म ईटें भक्तिसाह्य ॥ ३ ॥ निवृत्ति घनवट पिकलीसे पेठ। पुंडलिकें प्रगट केलें असे ॥ ४ ॥

२८७ ध्येयध्यान मनीं उन्मनी साधनीं। लावितां निशाणी ध्यानमार्गे ॥ १ ॥ तें रूप सघन गुणागुणसंपन्न। ब्रह्म सनातन नांवे इटे ॥ २ ॥ विठ्ठलनामसार ऐसाचि निर्धार। मुक्तिपारावार ती अक्षरीं ॥ ३ ॥ निवृत्ति निवांत राहिला निश्चित। केलेंसे मथीत पुंडलिकें ॥ ४ ॥

२८८ भाग्याचेनि भाग्यें उदो पै दैवयोगें । तें पुंडलिकासंगें भीमातटीं ॥ १ ॥ ध्यानमन एक करितां सम्यक । होय येकायेक येकतत्त्वें ॥ २ ॥ उदो अस्तु मेळें ब्रह्म मनमेळें । भोगिती सोहळे प्रेमभक्त ॥३॥ निवृत्ति निवांत विठ्ठलीं सतत । नेघे दुजी मात हरिविण ॥ ४ ॥

२८९ नामामृतपीक हेंचि घेई सुख । नलगती शोक जन्ममृत्यूचे ॥ १ ॥ रामनामकथा साधी कां परमार्था । पावसील पै हिता नाम घेतां ॥ २ ॥ विश्व हें पै अंध मायेचें विशद । नेणें अर्थभेद तरणोपाय ॥ ३ ॥ निवृत्ति म्हणे रूप तें प्रकाशले दीप । पंढरीसमीप भीमातीरीं ॥ ४ ॥

२९० संसारभ्रमें भ्रमले हे जीव । नेणती हे माव रोहिणीची ॥ १ ॥ जाईल हा देह सरेल आयुष्य । आपेंआप भविष्य उभें राहे ॥ २ ॥ वेगु करा आधीं रामनामचिंतना । जंव नाहीं पाहूणा काळ आला ॥ ३ ॥ सर्वत्र श्रीराम ऐसा करा वाचें । सुटतील मोहाचे मोहपाश ॥ ४ ॥ तिमिरपडळें निमालीं पै दृष्टि । प्रपंचसृष्टि दिसतसे ॥ ५ ॥ निवृत्तीचें सार रामकृष्णनाम । वैकुंठ परम सर्वकाळ ॥ ६ ॥

२९१ उपरति मनाची साधन विदेही । तरिजेल बाहीं रामनामें ॥१॥ हरिविण सुटिजे ऐसें नाहीं बोलिलें । सर्वहि शोधिलें शास्त्र आम्हीं ॥ २ ॥ द्वैताची हे वाढी प्रपंचाच्या घरीं । अद्वैतकामारी भोगिजेसु ॥३॥ निवृत्तीचें सार हरि हरि निर्मळ । साधन केवळ हरिपाठें ॥ ४ ॥

२९२ भावभक्तिप्रेमदयाशांतिक्षमा । अखंडित प्रेमा असों द्यावा ॥ १ ॥ सर्वभूतीं भजन करावें सर्वथा । रामनामकथा आरंभाव्या ॥ २ ॥ आपपरदेहीं विचार करावा । हरिनामें दोहावा सर्वांरूपीं ॥ ३ ॥ निवृत्तीचें जाप्य आनु नाहीं चित्तीं । रामनामें तृप्ति सदा असें ॥ ४ ॥

२९३ अजन्मा जन्मला अहंकार बुडाला । बोध पैं उठिला गोकुळीं रया ॥१॥ आपरूपें गोकुळीं आपरूपें आपं । अवघें स्वरूप हरिच जाणा ॥ २ ॥ रूपाचें रूपस सुंदर साकार । गोकुळीं निर्धार वृंदावनीं ॥ ३ ॥ निवृत्तीचें पुण्य वेणु वाहे ध्वनी । जनमनमोहनी एकरूप ॥ ४ ॥

२९४ एक देव आहे हा भाव पैं सोपा । द्वैतरूप बापा पडसीं नरकीं ॥ १ ॥ द्वैत सांडी अद्वैत धरी । एक घरोघरीं हरि नांदे ॥ २ ॥ सबाह्य कोंदलें परिपूर्ण विश्वीं । तोचि अर्जुनासि दृष्ट जाला ॥३॥ गयनीप्रसादें निवृत्तिबोधु । अवघाचि गोविंदु अवघ्या रूपीं ॥ ४ ॥

२९५ समसुखाचें विषम मोहाचें । द्वैत पापाचें घेसी झणी ॥ १ ॥ सम सेजबाजे सर्वत्र रे भोगी । एकरूप जगीं हरि नांदे ॥ २ ॥ स्वरूप सुलभु हरि माझा लाटा । नामेंचि वैकुंठा नेतु असे ॥३॥ निवृत्ति दिवटा सर्वकाळ जपे । वैकुंठ सोपें एक्या नामें ॥४॥

२९६ हरिविण भाव तो सर्वहि व्यर्थ । हरि हा समर्थ भाव थोर ॥ १ ॥ रामकृष्णनाम हाचि थोर उच्चार । भाव भावसार एका नामें ॥ २ ॥ नित्य नामघोष उच्चारितां वाचें । यमकाळ साचें वंदी तया ॥ ३ ॥ निवृत्ति स्मरतु रामनामभाव । सर्व एक देव चाड आम्हां ॥ ४ ॥

२९७ मनाची वासना मनेंचि नेमावी । सर्वत्र धरावी विठ्ठल-सोय ॥१॥ आपे आप निवेल आपें आप होईल । विठ्ठलची दिसेल सर्वरूपीं ॥ २ ॥ साधितां मार्ग गूढ वासना अवघड । गुरुमार्गी सुधड उपरति ॥ ३ ॥ निवृत्तिवासना उपरति नयना । चराचर खुणा हरि नांदे ॥४॥

२९८ एक तत्त्व सांगती वेदादिक बडिवार । ब्रह्मकर्म आचार भजनालागीं ॥१॥ आदिमध्यअवसान सत्वरजतम । प्रकृति सर्वत्र संपत्ति अळंकारला ॥२॥ सोहं पैं अनंतु सेवितां साचार । गुरुमुखें

उच्चार भजन केलें ।। ३ ।। देवी नांदे रसना धर्मी नांदे भावो । एकतत्त्वीं देवो क्षरला असे ।। ४ ।। आदिअंत हरला नाहीं तेथें कल्पना । देहीं दीप भाना विठ्ठलचरणीं ।। ५ ।। याचेनि परिपाठें नासतील पापें । एक नाम सोपें हरीचें जाणा ।। ६ ।। निवृत्ति साम्यता सर्वांघटी दिसतु । विठ्ठल हेचि मातु नित्यनेम ।। ७ ।।

२९९ नाहीं रूपीं सोय नाहीं ज्या रूपा । तेथिल ये कृपा खेळों आम्ही ।। १ ।। आम्हां हेंचि रूप अद्वैतस्वरूप । नाहीं तेथें किं लाभ कल्पनेचा ।। २ ।। ध्येयध्यान खुंटे प्रपंच आटे । नाम हें वैकुंठा नेतु असे ।। ३ ।। निवृत्तिसाधन वृत्तीचें संपन्न । नाम हें जीवन अच्युताचें ।। ४ ।।

३०० कल्पना कोंडूनि मन हें मारिलें । जीवन चोरिलें सत्रावीचें ।। १ ।। साजीव सोलिव निवृत्तीची ठेव । कृष्ण हाचि देव हृदयीं पूजी ।। २ ।। विलासविकृति नाहीं पैं आवाप्ति । साधनाची युक्ति हारपली ।। ३ ।। निवृत्तिकारण योगियांचें हृदयीं । सर्व हरिपाही दिसे आम्हां ।। ४ ।।

३०१ नाहीं त्या आचारु सोंविळा परिवारु । गोकुळीं साचारु अवतरला ।। १ ।। गाई चारी हरि गोपवेषधारी । नंदाचे खिल्लारीं ब्रह्म जालें ।। २ ।। ध्यातातिधारणें चिंतितातिमौन्यें । योगियांचीं मनें हारपति ।।३।। निवृत्ति म्हणे तें वसुदेवकुळीं । अवतार गोकुळीं घेतलासे ।। ४ ।।

३०२ न देखों सादृश्य हारपे पैं दृश्य । उपनिषदाचें भाष्य हारपलें ।। १ ।। तें रूप उघडें कृष्णरूप खेळे । गोपाळांचे लळे पुरविले ।। २ ।। न घडे हा प्रपंच नाहीं त्या आहाच । सर्व रूपें साच हरि आम्हां ।। ३ ।। निवृत्तीचें पर कृष्ण हा साचार । सर्व हा आचार कृष्ण आम्हां ।। ४ ।।

३०३ स्वरूप साजणी निद्रिस्त निजलें । भलें चेतविलें गुरुरायें ।। १ ।। सावध सावध स्मरे रे गोविंद । अवघा परमानंद दुमदुमित

॥२॥ निद्रेचिया भुलीं स्वरूप विसरू । प्रकाशला थोरु आत्माराम ॥३॥निवृत्ति देवो आनंद झालया । लवती बाहिया स्वस्वरूपीं ॥४॥

३०४ चेतवी चेतवी सावधान जिवीं । प्रकृति मांडवीं लग्न वोजा ॥१॥ मातृका मायावी निवेदन हरि । प्रपंचबोहरी रामनामें ॥२॥ निवृत्तिदेवीं अद्वैत परणिली शक्ति । निरंतर मुक्ति हरिनामें ॥ ३ ॥

३०५ हरिविण न दिसे जनवन आम्हां । नित्य ते पूर्णिमा सोळा कळीं ॥१॥ चंद्रसूर्यरश्मि न देखो तारांगणें । अवघा हरि होणें हेंचि घेवो ॥ २ ॥ न देखों हे पृथ्वी आकाशपोंकळी । भरलासे गोपाळीं दुमदुमीत ॥ ३ ॥ निवृत्तिनिष्काम सर्व आत्माराम । गयनीचा धाम गुजगम्य ॥ ४ ॥

३०६ पृथ्वी श्रीराम आकाश हे धाम । आपण विश्राम स्थूळ-रूपें ॥ १ ॥ सूक्ष्म स्थूळ राम साधक परम । नाम सर्वोत्तम सर्वांरूपीं ॥ २ ॥ आकारविकार सम सारिखाचि हरि । सबाह्य अभ्यंतरीं आपणचि ॥ ३ ॥ निवृत्ति निष्टंक ज्ञान तें सम्यक । गयनीविवेक सिद्धपंथ ॥ ४ ॥

३०७ सारनिःसार निवडूनि टाकीन । सर्व हा होईन आत्माराम ॥१॥ राम सर्वांघटीं बिंबेलासे आम्हां । पूर्ण ते पूर्णिमा सोळाकाळी ॥ २ ॥ न देखों दुजें हरिविण आज । आणिकाचें काज नाहीं तेथें ॥३॥ निवृत्तिगौरव गुरुमुखें घेत । आपणचि होत समरसे ॥ ४ ॥

३०८ प्राकृतसंस्कृत एकचि मथित । गुरुगम्य हेत पुराणमहिमा ॥ १ ॥ वेदादिक मत शास्त्र तें बोलत । श्रुतीचा संपत वाद जेथें ॥ २ ॥ पृथ्वी हें ढिसाळ आकाश कव्हळ । जन्म मायाजाळ विरत जेथें ॥ ३ ॥ निवृत्ति म्हणे गुरु गयनी सैारस । आपण जगदीश सर्वांरूपीं ॥ ४ ॥

३०९ भक्तिज्ञानवैराग्य तिहींचें शोधन । जनीं जनार्दन हेंचि खरें ॥१॥ भक्तिविण देव नपवे सावेव । रोहिणीची माव तैसा दिसे

।।२।। वैराग्यें तापलें ब्रह्मांड देखिलें । वासने मुंडलें निःसंदेहें ।।३।। निवृत्ति ज्ञानार्क विज्ञान सम्यक । भावशीळ देव जनीं इये ।।४।।

३१० पितृ गोत माता भजन स्वभावता । जन्मोनि अनंता प्रिय होय ।।१।। तोचि भजनपंथ सुगम समर्थ । नित्यता अनंत तृप्त असे ।।२।। पितृमाता विष्णु एक भाव प्रश्न । दिननिशीं कृष्णु न विसंबे रया ।।३।। निवृत्ति सादर कृष्ण परात्पर । मातापितासार आम्हां होय ।। ४ ।।

३११ द्वेषितां अच्युता द्वेषतां पूर्णता । न पवे अनंता भाव त्याचा ।।१।। भावें शीलकाज भावें अधोक्षज । भावें सकळ काज सफळ होय ।। २ ।। भाविक भजन भाविक पूजन । तेथे जनार्दन तुष्टतसे ।।३।। निवृत्तिकरुणाभाव नारायणा । सर्व जनार्दना अर्पियेलें ।।४।।

३१२ सुखदुःख कांही भजनप्रवाहीं । मायामोह पाही हरी रया ।। १ ।। हरिरूपीं सुख हरिरूपीं दुःख । हरिरूपीं शोक आत्मा माझा ।।२।। साकार निराकार सर्व हा आचार । हरिरूपसार भजनभाव ।।३।। निवृत्तीचें ज्ञान हरिरूप ध्यान । मनाचें उन्मन हरिरूपीं ।।४।।

३१३ निःसंदेह हरि भावयुक्त करी । भजन निर्धारी संतशीळ ।। १ ।। रजतम खंडी वासना हे मुंडी । चित्त हें अखंडीं हरिपंथीं ।।२।। साधन हरिपंथु हाचि निज हेतु । गुरुमुखें मातु ऐशी असे ।।३।। निवृत्तीचें धन हरि आत्मा जाण । हरि हाचि पूर्ण जनकु रया ।।४।।

३१४ मातेचें बाळक पित्याचें जनक । गोत हें सम्य हरि आम्हां ।।१।। मुकुंद केशव हाचि नित्य भाव । हरिरूप सावेव कृष्ण सखा ।। २ ।। पूर्वजपरंपरा ते धन अपारा । दिनाचा सोयिरा केशीराज ।।३।। निवृत्तीचें गोत कृष्णनामें तृप्त । आनंदाचें चित्त कृष्णनामें ।। ४ ।।

३१५ सौजन्य समाधान सर्व जनार्दन । आत्मरूपें धन इतुकें पुरे ।।१।। गोपाळ माधव कृष्णरूपें सर्व । ब्रम्हपद देव सकळ आम्हां

॥ २ ॥ द्वैतभाव वावो अद्वैत उपावो । सर्व ब्रम्ह देवो एक घ्यावो ॥ ३ ॥ निवृत्तीचा भावो सर्व आत्मारावो । हरि हा अनुभवो वेदमतें ॥ ४ ॥

३१६ प्राणिया उद्धार सर्व हा श्रीधरु । ब्रम्ह हें साचारु कृष्ण-मूर्ती ॥१॥ तें रुप भीवरें पांडुरंग खरें । पुंडलिकें निर्धारें उभें केलें ॥२॥ युगें अठ्ठावीस उभा हृषीकेशी । पुंडलिका सौरस पुरवित ॥३॥ निवृत्तीचें गुज पांडुरंगीं बीज । विश्वजनकाज पुरे कोडें ॥४॥

३१७ पितृपिता हरि पूर्वज पुरातनु । नाम नारायणु पांडुरंग ॥१॥ तो ध्यायिजे जना अद्वैतवासना । द्वैताची भावना दूरी करी ॥ २ ॥ वेदार्थाचा अर्थ पाहतां समर्थ । तोचि हा भरीत कृष्णराजु ॥३॥ निवृत्तीचा जपु गयनीसमीप । सर्व कृष्णरूप गुरु माझा ॥४॥

३१८ हरिविण व्यर्थ आचार समर्थ । हरि हेंचि हित अरे जना ॥ १ ॥ तें रूप पंढरी पुंडलिकासंगें । एका नामें पांग पाश तोडी ॥ २ ॥ सर्व ब्रम्हार्पण क्रिया करी जाण । वेदमतें खूण ऐसी असे ॥ ३ ॥ निवृत्तीचा देव सर्व हा गोविंद । नाहीं भिन्न भेद विश्वीं इये ॥ ४ ॥

३१९ पिंड हा नै धरि ब्रम्हार्पण करो । विष्णु चराचरीं ग्रंथीं पाहे ॥१॥ तें रूप विठ्ठल ब्रम्हाकार दिसे । पंढरीं सौरसें भीमारीं ॥२॥ जनांचे तारक पुण्यपूज्य लोक । तृप्त सनकादिक नामें होती ॥३॥ पतीतपावन नाम हें जीवन । योगियांचें ध्यान हरि आम्हां ॥ ४ ॥ वेणुनादीं काला पिंडावृत्ति जाला । भाग्यें भोगियेला दृष्टीपुढें ॥५॥ निवृत्ति म्हणे रूपडें अनंत । विठ्ठलसांकेत तरणोपाव ॥ ६ ॥

३२० जनासी तारक हेंचि एक । केलासे विवेक सनकादिकीं ॥ १ ॥ तें रूप पंढरीं वोळलेंसे देखा । अद्वैताची शाखा तोडीयेली ॥२॥ उगवलें बिंब अद्वैत स्वयंभ । नाम हें सुलभ विठ्ठलराज ॥३॥ निवृत्तीचें गूज विठ्ठल सहज । गयनीराजें मज सांगितलें ॥४॥

३२१ निराकार वस्तु आकारासी आली। विश्रांति पैं जाली विश्वजना ॥१॥ भिवरासंगमीं निरंतर सम। तल्लीन तें ब्रम्ह उभें असे ॥ २ ॥ पुंडलिक ध्येय पुढत पुढती सोये। विठ्ठल हेंचि गाये संकीर्तनीं ॥३॥ निवृत्तिसंकीर्तन ब्रम्ह हें सोज्वळ। नाम हें रसाळ अनिर्वाच्य ॥ ४ ॥

३२२ मनकामना हरि मनची बाहेरी। चिंतितां श्रीहरि सुखानंद ॥ १ ॥ तें पुंडलिकतपें वोळलें स्वरूप। जनाचीं पैं पापें निर्दाळिलीं ॥२॥ वेणूनादतीर्थ चंद्रभागा समर्थ। विठ्ठल दैवत रहिवास ॥ ३ ॥ निवृत्ति साकार विठ्ठल आचार। भिवरा तें नीर अमृतमय ॥ ४ ॥

३२३ पाहतां साधन विठ्ठलकीर्तन। भक्तसंजीवन आत्माराम ॥१॥ विठ्ठल सधर भिवरा। तें नीर नाम निरंतर केशवाचें ॥२॥ शिवसुरवर चिंतिती सुस्वर। किर्तनविचार पंढरीसो ॥३॥ निवृत्तिकीर्तन दिननिशीं ध्यान। मनाचें उन्मन ईये रूपीं ॥ ४ ॥

३२४ पुंडलिकसुख सांगतां अशेख। दिनकाळ हरिख कोंदाटला ॥ १ ॥ तें रूप सेविती मुनिजनसाधु। विठ्ठलनामें कुंदु तुटे जना ॥ २ ॥ नित्यता कीर्तन तुटेल बंधन। आत्मारामघन तुष्टेल जना ॥३॥ विवेकवैराग्य ज्ञानाचें सौभाग्य। नित्यता आरोग्य हरि सेवी ॥ ४ ॥ पर्वणीचें सार विठ्ठलउच्चार। नित्यता आचार विठ्ठलनामें ॥ ५ ॥ निवृत्ति घनदाट विठ्ठलनामपेठ। नित्यता वैकुंठ पंढरीये ॥ ६ ॥

३२५ रूपाचें रूपस विठ्ठलनामें वेष। पंढरीनिवास आत्माराम ॥ १ ॥ पुंडलीकभाग्य फळलें संपूर्ण। दिननिशीं कीर्तन विठ्ठल हरि ॥ २ ॥ त्रैलोक्य उद्धरे ऐसी पव्हे त्वरें। कीर्तननिर्धारें तरणोपाव ॥ ३ ॥ पुण्य केलें चोख तारिले अशेख। जनीं वनीं एक रूप वसे ॥ ४ ॥ वेदादिक मति ज्या रूपा गुंतती। तो आणूनि श्रीपति उभा केला ॥ ५ ॥ निवृत्तीचा सखा विठ्ठलरूप देखा। निरालंबशिखा गगनोदरीं ॥ ६ ॥

३२६ उघडें स्वरूप प्रत्यक्षाचें दीप । नाम घेतां पाप हरे जन ॥१॥ तें रूप विठ्ठल विनट सकळ । सेवा दिनकाळ पंढरीयेसी ॥२॥ रजतमें दूरी नामाची माधुरी । निशाणी एक सरी रामकृष्ण ॥३॥ भवाब्धितारक नावाडा विवेक । पुंडलीक देख सेवितुसे ॥४॥ विश्व हें तारिलें नामचि पिकलें । केशवीं रंगलें मनहेतु ॥ ५ ॥ निवृत्ति विठ्ठल सेवितु सकळ । दिनकाळफळ आत्माराम ॥ ६ ॥

३२७ प्रल्हाद परीक्षिती ध्रुव बळी म्हणती । उपमन्या गति क्षीरसागरीं ॥ १ ॥ भक्त हे तरले नामाचेनि बळें । कळिकाळासि खेळे दों अक्षरीं ॥२॥ आदि अंबऋषी भक्त निजसखा । दों अक्षरीं लेखा केला तेणें ॥ ३ ॥ उद्धव अक्रूर आणि तो विदुर । दों अक्षरीं पार उतरले ॥ ४ ॥ हनुमंत दास रामनामें उदास । कळिकाळासी भाष सांगतसे ॥५॥ द्रौपदी सुभद्रा गोपाळ गोपिका । बळिभद्र सखा दों अक्षरीं ॥६॥ नंद तो वसुदेव उग्रसेन राजा । यादव पैं पैजा दों अक्षरीं ॥ ७ ॥ निवृत्ति म्हणे अक्षर दोनी रामनाम । जपतां पावे धाम वैकुंठींचें ॥ ८ ॥

३२८ पंढरीये चोख रूपडें अशेख । भीमातीरीं देख पुण्यभूमी ॥१॥ आदिपीठ देव ब्रम्ह हें स्वयमेव । पुंडलीकभाव प्रगटला ॥२॥ जन हें काळ तारक गोपाळ । कीर्तनीं कळिकाळ दूरी ठाये ॥ ३ ॥ नाम हें विठ्ठल नलगे पैं मोल । नित्यता सकळ पांडुरंग ॥४॥ त्रिविधताप पाप त्यजितील अमूप । पुरतील संकल्प एक्या नामें ॥५॥ निवृत्ति म्हणे जो धन्य कीर्तन करी । सर्वत्र चराचरीं बोलियेलें ॥ ६ ॥

३२९ सर्व कामधन सर्वसिद्धिपूर्ण । पतीतपावन हरि एक ॥१॥ तें रूप पंढरीं पुंडलिका वोळलें । आणूनि ठेविलें भीमातीरीं ॥२॥ नलगती त्या सिद्धि करणें उपाधी । नित्य चित्तशुद्धि विठ्ठलनामें ॥३॥ कळिकाळासी त्रास चित्तीं हृषीकेश । उगवला दिवस सोनियाचा ॥ ४ ॥ त्रिभुवनीं थोर क्षेत्र पैं साचार । विठ्ठल उच्चार भीमातीरीं ॥५॥ निवृत्ति तत्पर निवाला सत्वर । नित्यता आचार विष्णुमय ॥६॥

३३० प्रालब्धसंचित विठ्ठल दैवत । कुळीं उगवत भाग्ययोगें ।। १ ।। तें रूप पंढरीं उभें असे सानें । त्रिभुवन ध्यानें वेधियेलें ।। २ ।। उगवली ज्योत प्रभा पैं फांकती । नाहीं दिनराती पंढरीसी ।। ३ ।। प्रभात हरपे सायंकाळ लोपे । दिनमणी दीपे विठ्ठलप्रभा ।। ४ ।। पृथ्वी हे ढिसाळ वायु व्योमफळ । सेवितां अढळ जोडती रया ।। ५ ।। निवृत्ति सप्रेम जोडती सर्वकाम । पंढरीये राम विश्रामले ।। ६ ।।

३३१ नित्य हरिकथा नित्य नामावळी । वैष्णवांचे कुळीं धन्य जन्म ।। १ ।। म्हणोनि पंढरी उपजावें संसारीं । प्रत्यक्ष श्रीहरि तीरीं उभा ।। २ ।। नित्यता दिवाळी नाहीं तेथें द्वैत । नित्यता अच्युत तिष्ठतुसे ।। ३ ।। निवृत्ति सादर विष्णुमय सार । विठ्ठल आचार पंढरीये ।।४।।

३३२ भवजळ काया पंचतत्त्व माया । भजन उपाया पंढरीरावो ।। १ ।। तारक पंढरी प्रसिद्ध भीमातीरीं । ब्रीदें चराचरीं बोले वेदु ।। २ ।। मायामोहजाळ ममता निखळ । सेविता सकळ होय हरि ।। ३ ।। निवृत्तीचें फळ सकळ गोपाळ । तोडी मायाजाळ संकीर्तनें ।। ४ ।।

३३३ विठ्ठल श्रीहरि उभा भीमातीरीं । तिष्ठती कामारी मुक्ति चारी ।। १ ।। मुनिजनां सुख निरंतर लक्ष । भक्तांसीं निजसुख देत असे ।।२।। पुंडलीक पुण्य मेदिनी कारुण्य । उद्धरिले जन अनंत कोटी ।। ३ ।। निरा निरंतर भीमरथी तीर । ब्रह्म हें साकार इटे नीट ।। ४ ।। नित्यता भजन जनीं जनार्दन । ब्रह्मादिक सूण पावताती ।। ५ ।। निवृत्ति तत्पर हरिरूप सर्वत्र । नाम घेतां तृप्त आत्माराम ।। ६ ।।

३३४ निरपेक्षता मन अनक्षर मौन्य । प्रकाश संपूर्ण तया ब्रह्म ।।१।। ऐसें रूप पहा क्षरे दिशा दाहा । सर्वभावें मोहा एका कृष्णा ।। २ ।। नित्यता अढळ नित्यपणें वेळ । विकाश आकळे नित्य तेजें ।।३।। रूप सुंदर पवित्र आगर । चोखाळ साकार पवित्रपणें ।।४।।

नेणें हे विषय आकार न माये । विकार न साहे तया रूपा ॥ ५ ॥
निवृत्ति तत्पर कृष्ण हा साकार । ॐ तत्सदाकार हरि माझा ॥६॥

३३५ पुंडलीक पेठे वैष्णवांचा हाट । करिती बोभाट हरि-नामाचा ॥ १ ॥ वोळलें अंबर अमृततुषार । झेलीत अमर चकोर झाले ॥ २ ॥ देव मुनी सर्व ब्रह्मादिक लाटे । पंढरीये पेठें प्रेमपिसे ॥ ३ ॥ निवृत्ति निर्वाळला ज्ञानदेव । सोपान खेचर तल्लीन त्रिनटला ॥ ४ ॥

३३६ हरिदाससंगें हरिदास खेळे । ब्रह्मादिक सोहळे भोगिताती ॥ १ ॥ संतमुनीदेव सनकादिक सर्व । त्यांही मनोभाव अर्पियेला ॥ २ ॥ पुंडलीकफळ वोळलें सकळ । शंकर सोज्वळ प्रेमें डुले ॥ ३ ॥ निवृत्ति लोळत चरणरजीं लाटा । माजीं त्या वैकुंठा आत्मलिंगीं ॥ ४ ॥

३३७ वोळलें दुभतें सर्वांसी पुरतें । प्रेमाचें भरितें वैष्णवांसी ॥ १ ॥ वोळती चरणीं वैष्णव गोमटे । पुंडलीकपेठे हरि आला ॥२॥ सोपान खेचर ज्ञानदेव लाठा । देताती वैकुंठा क्षेम सदा ॥३॥ निवृत्तीनें हृदयीं पूजिलें तें रूप । प्रत्यक्ष स्वरूप विठ्ठलराज ॥ ४ ॥

३३८ अद्वैत अमरकंदु हा घडला । ब्रह्मांडीं संचला ब्रह्म साचें ॥१॥ तें रूप कारण कृष्ण तेजाकार । सर्व हा आकार त्याचा असे ॥२॥ विराट विनटु विराट दिसतु । आपणचि होतु ब्रह्मसुख ॥३॥ निवृत्ति कोंवळें आपण सोंविळें । त्यामाजीं वोविळें मन माझें ॥४॥

३३९ उफराटी माळ सुफराटें ध्यान । मनाचें उन्मन मूर्ति माझी ॥ १ ॥ तें रूप आवडे भोगिती साबडे । यशोदेशीं कोडें बुझावितु ॥२॥ मोठेंनि परिमारण हारपलें ध्यान । आपणचि कृष्ण सर्व ज्ञाला ॥३॥ निवृत्तीची जपमळा हे गोमटी । मन हें वैकुंठीं ठेवियेलें ॥४॥

३४० विश्रामींचा श्रम आश्रम पैं नेम । जप हा परम आत्मलिंगीं ॥ १ ॥ वैकुंठ घनदाट कृष्णरूपें आम्हां । अखंड पूर्णिमा नंदाघरीं

॥ २ ॥ निवृत्तिचित्ताची गेली लगबग । केला अनुराग कृष्णरूपीं ॥३॥ निवृत्तिधारणा कृष्णनामसार । सर्वत्र आचार हरि हरि ॥४॥

३४१ परापवाद कानीं परनिंदा ज्ञणीं । ऐकतां निजमनीं कृष्ण जपे ॥ १ ॥ हरि हरि म्हणे नायकते मात । द्वैत तया आंत नेघे बापा ॥२॥ दुजियाची निंदा आपवाद सदा । वाचेसी गोविंदा चप करी ॥ ३ ॥ निवृत्ति तत्पर नायके ते शब्द । नित्यता गोविंद जपतसे ॥ ४ ॥

३४२ परनिंदा ज्ञणी परपीडा जनीं । नित्यता कीर्तनीं हरि जपें ॥ १ ॥ उच्चारा पापाचा विभाग ये त्याचा । वेगें हरि वाचा जपे रया ॥२॥ दूजियां पीडणें द्वैत तेंचि जाण । अद्वैत ते खूण हरि एक ॥३॥ निवृत्तितटाक सर्व कृष्ण एक । अद्वैत हे लेख ब्रह्म सत्य ॥४॥

३४३ परासी परतें परनिंदा नको । सर्व विष्णु एको हेंचि ब्रह्म ॥ १ ॥ यांतें पैं निंदतां न पवसी अच्युता । हरि हरि म्हणतां उद्ध-पसी ॥ २ ॥ जन ब्रह्म हरि यातें ज्ञणें निंदितां । ब्रह्मसायोज्यता न रवसी ॥ ३ ॥ निवृत्ति तत्पर सर्व लेखी आप । वासनासंकल्प रामकृष्ण ॥ ४ ॥

३४४ दुजियाची निंदा दुजेपण सदा । द्वैत तें गोविंदा नावडे रया ॥१॥ दुजेपणा भिन्न सर्व जनार्दन । ब्रह्म सनातन पावसी रया ॥२॥ वांया द्वैतभाव दुजिया छळणें । ब्रह्म हें येसणें ठाव नेदी ॥३॥ निवृत्ति म्हणे तो नर येथें गुंफला । द्वैताचा गोंविला मोतिमाळे ॥४॥

३४५ अपशब्द कानीं पडतां तें द्वैत । नाम हें अच्युत नये राया ॥ १ ॥ परनिंदा पीडा करितांचि मूढा । पडिलासि वेढा योनीमाळें ॥ २ ॥ आपस्तुति नको आपपर एको । विष्णुपणें लोपो भान तुझें ॥ ३ ॥ निवृत्तितत्पर द्वैत हें निरसी । अद्वैत समरसी दिधला असे ॥ ४ ॥

३४६ आपपरशून्य आपीं कपीं करी लीन । आपपर जाण हरि असे ॥१॥ करितां उपाधी द्वैत तें उपजे । तया अधोक्षजें नुद्धरिजे

॥ २ ॥ दुजिया सौजन्यें दुजेपण सांडी । अद्वैत पैं मांगी सुखगोष्टी ॥३॥ निवृत्ति साकार परासी अद्वैत । परे परमामृत गोपवेषें ॥४॥

३४७ वासनेचें द्वैत सांडूनि परतें । अद्वैत अरुतें भोगी हरि ॥ १ ॥ दुजियाची सृष्टि नाहीं नाहीं भिन्न । सर्व नारायण बिबला असे ॥ २ ॥ आत्मरूपें जन मानी कां रे मूढा । होसीमाजीवडा ब्रह्मामाजीं ॥ ३ ॥ निवृत्ति म्हणे द्वैत सांडी सांडी कथा । अद्वैत अच्युता नित्य सेवी ॥ ४ ॥

३४८ पितृमाता निंदितां द्वैत हेंचि खोटें । अर्चन गोमटें एको विष्णु ॥ १ ॥ निंदितां पितरांसि नपवे हृषीकेशी । दोनीचे माळेसी गुंफसील ॥ २ ॥ वित्तशाठ्य करी प्रपंचाचरण । पितृ जनार्दन न पावसी ॥ ३ ॥ निवृत्ति म्हणे नर द्वैताचा पामर । अद्वैतीं सुरवर नाहीं रया ॥ ४ ॥

३४९ श्यामाची श्यामशेज वरी निजतेज विराजे । सहज केशीराजे क्षीरार्णवीं ॥१॥ शेषशयन अरुवारीं गोविंद क्षीरसागरीं । तो नंदयशोदेघरीं क्रीडतुसे ॥ २ ॥ अनंतनामीं क्षीर क्षरलासे साचार । गोपिकांसमोर हरिराजा ॥ ३ ॥ नाहीं योगिया दृष्टी मनोमनें करी सृष्टी । पाहातां न दृष्टि विज्ञान हरी ॥ ४ ॥ शांति नेणें क्षमे पारू विश्रांतीसी अरुवारु । तो कैसा पां उदारु गोपाळांसी ॥ ५ ॥ विचाराचें देटुगें आकार निकार सांगे । तो गोसावी निगे गोकुळीं रया ॥६॥ निवृत्तिपरब्रह्म रामकृष्णविजयब्रह्म । चिंतिता चिंताभ्रम नासोनि जाय ॥ ७ ॥

३५० शांतिक्षमादया सर्वभावीं करुणा । तोचि नारायणा आवडें दासु ॥ १ ॥ तोचि एक साधु बोलिजे पैं जनीं । निरंतर ध्यानीं कृष्णमूर्ति ॥२॥ जीवशिव एक सर्वत्र चैतन्य । ऐसे जया कारुण्य तोचि धन्य ॥ ३ ॥ तोचि एक भक्तु हरि हरि म्हणे । नित्य नारायणें तारिजे त्यासी ॥ ४ ॥ येउनी जनी सदां तो विदेही । तारकु सबाहीं सप्रेम ॥ ५ ॥ निवृत्ति सांगतु भक्तीचा महिमा । करी शांतिक्षमा तो विरळा असे ॥ ६ ॥

३५१ नलगती धनें असार संपत्ति। वायांचि गुंफती वासना रया ॥ १ ॥ सार हरिनाम सार हरिनाम । नित्यता सप्रेम जपो आम्हीं ॥२॥ ध्येयध्यान स्थिर मनाचा सांठा । नामेंचि वैकुंठा भक्त गेले ॥ ३ ॥ निवृत्ति तत्पर रामनाम चित्तीं । एकनामें तृप्ति सर्व काळ ॥ ४ ॥

३५२ सहापाताळें एकवीस स्वर्गं पुरोनि उरला हरि। काया-मायाछाया विवर्जित दिसे तो आहे। दुरी ना जवळी गे बाईये ॥१॥ प्रत्यक्ष हरि तो दावी या डोळां । ऐसा सद्‌गुरु कीजे पाहोनी । तनुमनधन त्यासी देऊनी। ते वरतु घ्यावी त्यासी मागोनि ये बाईये ॥ २ ॥ पावडा पाव आणि करी परवस्तुसी भेटी। ऐसा तोचि सद्‌गुरु रें। सद्‌गुरुविण मूढासि दर्शन कैंचे। ऐसा तोचि चमत्कारु गे बाईये ॥ ३ ॥ एक मंत्र एक उपदेशिती गुरु। ते जाणावे भूमि-भारु। निवृत्ति म्हणे तत्त्वसाक्षत्वें दावी। ऐसा तोचि चमत्कारु गे बाईये ॥ ४ ॥

३५३ विस्तार विश्वाचा विवेकें पैं साचा । बोलतांचि वाचा हरपती ॥ १ ॥ तें रूप श्रीधरकृष्णाचा आकार। सर्व निराकार एकरूपें ॥ २ ॥ नसतेनि जीव असतेनि शिव । तदाकार माव मावळली ॥ ३ ॥ निवृत्तिस्वरूप कृष्णरूप आप। विश्वीं विश्वदीप आपेंआप ॥ ४ ॥

३५४ तारक प्रसिद्ध तीर्थ तें अगाध। नामाचा उद्बोध नंदाघरीं ॥१॥ प्रकाशपूर्णता आदिमध्यें सत्ता। नातळे तो द्वैताद्वैतपणें ॥२॥ निवृत्तिसाधन कृष्णरूपें सुख । विश्वीं विश्वरूप हरि माझा ॥ ३ ॥

## श्री निवृत्तिनाथ यांची आरती.

आरती निवृत्तिनाथा । पदीं ठेवूनिया माथां ॥
भक्तिभावें ओवाळीन । सदा तुझे गुण गातां ॥ध्रु०॥
जगीं अवतार धरूनियां । भक्तजन तारिले ॥
दावूनियां भक्ति-ज्ञान पंथा । भक्ताकृतार्थ केलें ॥१॥
गुण मी काय वर्णूं । न पुरे ही वाणी ॥
ठाव द्यावा चरणीं । श्रीरामा सद्‌गुरूधामा ॥२॥ ॥आ०॥

---

# श्री सोपानदेव यांचे अभंग

१ विठ्ठल पैं सार हा जपु आमुचा । आणि त्या शिवाचा नित्यनेमु ॥ १ ॥ गोविंद श्रीहरि हेंचि तो उच्चारी । शिव चराचरीं आत्मारामु ॥ २ ॥ नामेंवीण नेणें दुजियाची मातु । गोविंदे स्मरतु शिवराणा ॥३॥ सोपानधारणा गोविंदपाठाची । कोटी पैं कुळांची कळवटी ॥ ४ ॥

२ हरि असे देहीं सर्वकाळ संपन्न । म्हणोनि चिंतन निरंतर ॥ १ ॥ हरीवीण नाहीं हरीवीण नाहीं । दिशाद्रुम पाही बिंबलसे ॥ २ ॥ हरीवीण देवो नाहीं अन्य भावो । हरि असे सर्व देहभावीं ॥ ३ ॥ सोपान सांगतु हरि सर्वत्र वसे । भाग्यवंता दिसे सर्वकाळ ॥ ४ ॥

३ गोविंद माधव हा जपु आमुचा । नाहीं प्रपंचाचा आम्हां लेशु ॥ १ ॥ गोविंदस्मरणें नित्यता पारणें । हरिनामपठणें मोक्षमुक्ति ॥ २ ॥ नलगती तीर्थें एक गोविंदु पुरे । वेगीं कृष्ण धुरें बोळंगो सदा ॥ ३ ॥ सोपान सांगत गोविंदस्मरणें । नित्यता पैं ध्यानें गोविंद ऐसें ॥ ४ ॥

४ गोपाळ अच्युत हा नाममहिमा । नित्यता पूर्णिमा आम्हां देहीं ॥ १ ॥ रामकृष्णनाम हा जप परम । ऐसा नित्य नेम सारूं रया ॥ २ ॥ वासना वोढाळ नेघों पैं बरळ । नित्यता अढळ गोपाळ सेवूं ॥३॥ सोपानसार जपतुसे नाम । दिननिशीं नेम हृदयांतु ॥४॥

५ सर्वघटीं रूप सम सारिखें आहे । म्हणोनियां ते सोय आम्हां भक्तां ॥१॥ निर्गुणीं सगुण गुणामाजीं गुण । जन तूं संपूर्ण दिससी आम्हां ॥ २ ॥ तेंचि रूप रूपस दाविसी प्रकाश । पंढरीनिवास होउनी ठासी ॥ ३ ॥ सोपानसलगी न बोलतां उगा । तुजवीण वाउगा नाहीं ठावो ॥ ४ ॥

६ मी नेणें ती भक्ति नेणें त्या मुक्ति । तुझ्या नामपंथीं मार्गु मना ॥ १ ॥ हेंचि मज चाड न करिसी आशा । तुज हृषीकेशा चिंतीतुसें ॥ २ ॥ तूंचि माझें धन जोडी हे निजाची । जननी तूं आमची जीवलगे ॥ ३ ॥ सोपान म्हणे तुजवीण नकळे । तुजमाजीं सोहळे मनें केले ॥४॥

७ रामकृष्णमूर्ति या पूजीतसें भावें । सर्व तुवां व्हावें केशीराजा ॥१॥ राम राम म्हणे नित्य काळ सदां । नेणें दुजा धंदा तुजवीण ॥२॥ माहेर आठवे करितां कामना । तुझ्या चरणीं वासना जडोनि ठेली ॥ ३ ॥ सोपान म्हणे सरतें तूजचि आवडतें । माझ्या मनोरथें तुझी आशा ॥४॥

८ कृष्णाचिया पंथें चालिलों दातारा । तंव मार्ग एकसरा तुजमाजीं ॥ १ ॥ आदि ब्रह्ममूर्ति तूंचि विष्णुस्थिती । तुज कैवल्य-पति मोल नाहीं ॥ २ ॥ अमोल्य जे वस्तु पुंडलिकठेवा । जगाचा विसांवा जनकु माझा ॥ ३ ॥ सोपान म्हणे सांकडें तुजचि सर्व कोडें । विनवितु मी वाडें चरणापाशीं ॥४॥

९ आवडीचें मार्गें प्रवृत्तीचें नेघें । नाममार्गें वोळगें निघे रया ॥१॥ नाम परब्रह्म नाम परब्रह्म । नित्य रामनाम जपीतसु ॥२॥

अंतरींच्या सुखें बाहिरिलिया वेखें । परब्रह्मसुखें जपतुसें ।। ३ ।। सोपान निवांत रामनामसुखांत । नेणें दुजी मात हरीवीण ।।४।।

१० सबाह्य कोंदलें निवांत उगवलें । रामरसें रंगलें अरे जना ।। १ ।। हरिरामकृष्ण हरिरामकृष्ण । दिनानिशीं प्रश्न मुखें करा ।। २ ।। तरा पं संसार रामनामें निरंतर । अखंड जिव्हार रामरसें ।। ३ ।। सोपान जपतु रामनामीं रतु । नित्यता स्मरतु रामकृष्ण ।। ४ ।।

११ अव्यक्ताच्या घरीं प्रकृति कामारी । निघे माजिघरीं दंडोनियां ।।१।। तैसें नका करूं प्रगट सर्वेश्वरू । हरिनाम उच्चारु जपा वाचें ।। २ ।। विज्ञानीं पै ज्ञान आटलें संपूर्ण । उभयतां चैतन्य तैसा हरि ।। ३ ।। सोपान निवांत रामनामीं रत । संसार उचित रामनामें ।। ४ ।।

१२ मोक्षालागीं धन वेंचावें नलगें । रामकृष्ण ओळंगे जपीतसु ।।१।। रामकृष्ण मुखें तया अनंत सुखें । तो जाय विशे वैकुंठभुवनीं ।।२।। वेगाचेनि वेगें जपा लागा वेगें । प्रपंच वाउगें हरिनामें ।।३।। सोपान संचित रामनामामृत । नित्यता सेवित हरिकथा ।।४।।

१३ सर्वकाळ ध्यान हरिरूप ज्याचें । तया सर्वरूप साचें जवळीं असे ।। १ ।। हरि हरि जाला प्रपंच अबोला । हरिसुखें निवाला तोचि धन्य ।। २ ।। हरि हेंचि मन संपन्न अखंड । नित्यतां ब्रह्मांड त्याचे देहीं ।। ३ ।। सोपान विदेही सर्वरूपीं बिंबतु । हरिरूपीं रतु जीवशिव ।।४।।

१४ मनाचे मवाळ हरिरूप चिंतिती । रामकृष्णमूर्ति नित्यकथा ।।१।। रामकृष्णध्यान सदा पै सर्वदा । न पवेल आपदा नाना योनी ।।२।। हरिध्यानजप मुक्त पै अनंत । जीवशिवीं रत सर्वकाळ ।।३।। सोपान प्रेमाचा आनंद हरीचा । तुटला मोहाचा मोहपाश ।।४।।

१५ हरि सुखवेषें नाचत सर्वदां । गोविंद परमानंदा हरिबोधें ।। १ ।। रामकृष्णनामीं या नामें आनंदु । नित्यता गोविंदु आम्हां

घरीं ॥ २ ॥ निर्गुण नेणों सगुण–निर्धार । सगुण आचार सर्वकाळीं ॥ ३ ॥ सोपान पादप अवघेंचि हरिरूप । हरीवीण स्वरूप नेघे चित्तीं ॥४॥

१६ चला रे वैष्णवहो जाऊं पंढरियेसी । प्रेमामृतखुण मागों त्या विठ्ठलासी ॥१॥ चालिले गोपाळ वाताती वांकुल्या । भरले प्रेमरसें मग ते वाताती टाळिया ॥ २ ॥ दिंडचा गरुडटके मृदंगाचे नाद ॥ गातातो विठ्ठलनाम करितातो आल्हाद ॥ ३ ॥ पावले पंढरी भीमा देखियेली दृष्टीं । वैष्णवांचा गजरु आनंदें हेलावली सृष्टी ॥ ४ ॥ गजरु गोपाळांचा श्रवणीं पडियेला । शंखचक्र करीं विठ्ठल सामोरा आला ॥ ५ ॥ कांसवदृष्टीं न्याहाळींतु रंगीं नाचत पैं उगला । सोपान म्हणे आम्हीं वाळुवंटी केला काला ॥ ६ ॥

१७ आणीक ऐकें गा दूता । जेथें रामनामकथा । तेथें करद्वय जोडूनि हनुमंता । सदा सन्मुख असिजे ॥ १ ॥ रामनामीं चाले घोषु । तो धन्य देशु धन्य दिवसु । प्रेमकळा महा उल्हासु । जगनिवासु निववितु ॥ २ ॥ दिंडचा पताका मृदंग । टाळ घोळ नामें सुरंग । तेथें आपण पांडुरंग । भक्तासंगें नाचत ॥ ३ ॥ तया भक्तां तिष्ठती मुक्ती । पुरुषार्थ तरी नामें कीर्ति । रामनामीं तया तृप्ती । ऐसें त्रिजगतीं यमु सांगतु ॥ ४ ॥ ज्या नामे शंकर निवाला । गणिका अजामिळ पद पावला । अहिल्येचा शाप दग्ध जाला । तोचि पान्हा दिधला पांडुरंगें ॥५॥ चित्रगुप्त म्हणती यमा । काय करावें गा धर्मा । लोक रातेल रामनामा । पुरुषोत्तमा विठ्ठल देवा ॥ ६ ॥ कळिकाळ दाटुगें नाम । रुद्रें धरिलें महा प्रेम । त्रिभुवनीं विस्तारेल सप्रेम । रामनाम उच्चारी यम । तोही रतला जाणा ॥७॥ ऐसें नाम अगाध बीज । उच्चारी तो होय चतुर्भुज । सोपान म्हणे हें गुज । उमाशंकरदेवाचें ॥ ८ ॥

१८ नाहीं नाहीं भान न दिसे प्रपंच । रोहिणी आहाच मृगजळ ॥१॥ तुटलासे सांठा वासना चोखाळ । दिननिशीं फळ राम झाला ॥ २ ॥ रामेंविण दुजें नाहीं पैं होविजे । बोलतु सहजें वेदु जाणा

॥३॥ निवृत्ति खुणावी ज्ञानदेवा हरि। सोपान झडकरी झोंबियेला ॥ ४ ॥

१९ काढलें कुटाळ वासनाबळ। सर्व हा गोपाळ भरियेला ॥१॥ गेला पै परतें शरीर हें रितें। नाशिवंत भूतें दूरी केलीं ॥ २ ॥ स्थावरजंगम स्थावरिला राम। सर्वगतशाम निःसंदेहें ॥ ३ ॥ सोपान विनटे परब्रह्म घोटे। प्रपंच सपाट निवटियेला ।४॥

२० राम सर्वोत्तम या नामें निखळ। जन हें सफळ दिसताहे ॥१॥ भिन्न नाहीं दुजें सर्व आत्माराज। नाचतातो भोज योगीराज ॥२॥ मातापिता देव गृहदाराजन। सर्व जनार्दन सर्वांरूपीं ॥३॥ सोपान खेचर ब्रह्म माजिवडें। ब्रह्मांडाएवढें आत्माराम ॥४॥

२१ दुजेपणीं ठाव द्वैत तें फेडिलें। अद्वैत बिंबलें तेजोमय ॥१॥ तेजाकार दिशा बिंबीं बिंब एक। निवृत्तीनें चोख दाखविलें ॥ २ ॥ निमाली वासना बुडाली भावना। गेली ते कल्पना ठाव नाहीं ॥ ३ ॥ सोपान नैश्वर परब्रम्ह साचार। सेवित अपार नामघोटें ॥ ४ ॥

२२ हरिविण दुजें न देखे चित्त माझें। म्हणोनि सहजें विचरतु ॥१॥ सर्व हरि हरि तो माझा कंवारी। दुजी भरोवरी नेघों आम्हीं ॥ २ ॥ राम हा सकळ सर्व आम्हां आहे। दुजें तें न साहे परब्रम्हीं ॥ ३ ॥ सोपान सलगी विनवितो तुम्हां। सर्व हा परमात्मा आम्हां दिसे ॥ ४ ॥

२३ हरिविण नाहीं देहादिक मती। श्रुति त्या संपत्ति जया रूपीं ॥ १ ॥ हरि हाचि सर्व उपनिषदभाव। रोहिणीची माव जनीं दिसे ॥२॥ सर्वघटीं राम जीवशिवसम। सर्वरूपें ब्रम्ह भरलें सदां ॥ ३ ॥ सोपान निकट परब्रम्ह सेवी। सर्व हा गोसावी विठ्ठलराज ॥ ४ ॥

२४ आम्हीं नेणों माया नेणों तेही काया। ब्रम्ह लवलाह्या आम्हांमाजीं ॥ १ ॥ मीतूं गेलें पूर्णीं। वासना ते जनीं ब्रम्ह जाली

।।२।। जीवशिवभाव आपणचि देव । केला अनुभव गुरुमुखें ।। ३ ।। सोपानब्रह्म वर्ततसे सम । प्रपंचाचा भ्रम नाहीं नाहीं ।।४।।

२५ दिन व्योम तारा ग्रहण शेखीं । एक हृषीकेशी सर्व आम्हां ।। १ ।। ब्रम्हेंविण नाहीं रिता ठावो पाहीं । निवृत्तीच्या ठायीं बुडी देत ।। २ ।। सर्व हें निखळ आत्माराम सर्व । नाहीं देहभाव विकल्पता ।। ३ ।। सोपाननिकट गुरुनामें पेठ । नित्यता वैकुंठ जवळी असे ।।४।।

२६ पाहोत न नटे मन तिये वाटे। बोलणेंचि खुंटे बोलणेंपणें ।। १ ।। परतल्या श्रुति पडियेलें मौन्य । शास्त्र तें संपन्न नेणें तया ।।२।। गेला तो आचार अवघाचि विचार । परेपरता पर परब्रह्म ।।३।। सोपान दयाळ गुरुनामें बळ । आपण निखळ आपरूपें ।।४।।

२७ आपरूप हरि आपणचि देव । आपणचि भाव सर्व जाला ।। १ ।। सर्व हरिहर बाह्य अभ्यंतरीं । एक चराचरीं आत्माराम ।।२।। सर्वकाळ सम नाहीं तेथें विषम । आपणचि राम सर्वज्योती ।।३।। सोपान तिष्ठत रामनामलीन । मन तेथें मौन एकपणें ।।४।।

२८ निकाम निश्चळ निश्चित स्वरूप । तेथें निर्विकल्प मन गेलें ।। १ ।। ध्येय गेलें ध्यान ध्याता माजीं पूर्ण । आपण सनातन होऊनि ठेला ।।२।। निर्गुणनिरालंबनिर्विकारफळ । आपणचि सकळ होऊनि ठेला ।। ३ ।। सोपान जिव्हाळें मनाचें तें आळें । परब्रह्म सांवळें तयामाजीं ।।४।।

२९ ज्ञानदेवीं आन नाहीं तेथें भिन्न । प्रपंचाचें भरण तेथें नाहीं ।।१।। स्वरूपाची खूण होऊनि सफळ । भोगी सर्वकाळ सच्चित्सत्ता ।।२।। आत्मापरमात्मा भेदाभेदद्वंद्व । एकतत्व अभेद जनीं वनीं ।।३।। सोपानदीपनदीपीं तें जीवन । तयामाजीं मन पक्व जालें ।। ४ ।।

३० वैकुंठ सगळें न करूं आगळें । मन ब्रह्ममेळें एक ठेलें ।।१।। उपमे वैकुंठ ब्रह्म हें तत्वबीज । सूचना अखंड सर्वभूतीं ।।२।। उदयो

अस्तु परिमाण ब्रह्म । चंद्रसूर्यनेम हारपले । ।३ ।। सोपान तो क्षेत्रीं जन हेंचि क्षेत्र । तेथें तो विचित्र हरपला ।। ४ ।।

३१ शांति दया क्षमा तेथील उपाया । निर्गुणीं ते माया आपरूप ।।१।। ज्योतिरूप छाया सर्व हें निर्गुण । आत्माराम भिन्न नाहीं नाहीं ।।२।। मौनें परे मिठी पश्यंतीसी नुठी । मध्यमेच्या बेटीं खुंटे तारूं ।। ३ ।। सोपानवैखरी देहामाजीं भरी । पूर्ण तो श्रीहरि बिंबीं बिंब ।।४।।

३२ नादब्रह्मुसे नादरूप वसे । तैसा जनीं दिसे आत्मपणें ।।१।। बाहेर साबडा आत्मा दिसे घडा । मातीचा वेढा जीवनालागीं ।।२।। तैसें हें शरीर आत्मपणें नीट । मन हें निकट चोखाळपणें ।। ३ ।। सोपान साजिरें ब्रह्म ते गोजिरें । जीवन साकार ब्रह्महेतु ।। ४ ।।

३३ नादरसी लीन ब्रह्म सामावलें । त्यामाजीं सानुलें मन चोख ।।१।। मन हें निकट ब्रह्मपणें चोख । ब्रह्मीं ब्रह्म लेख एकपणें ।।२।। साशंकित गावो जाला परिमाण । घटमठा दिन हारपला ।। ३ ।। सोपान सोपारे निरालंब निर्धारें । नंदाचें गोजिरें माजीं खेळे ।।४।।

३४ नादरूपठसा निरालंब जाला । सगुणीं उदेला तेजाकार ।।१।। रूप तेजीं आपरूप काजीं । जीवशिव भोजीं नांदताती ।।२।। राहतें पाहतें जिवातें पोखितें । आपणचि उखितें दिसे एक ।। ३ ।। सोपानीं नलगे प्रपंचवियोग । ब्रम्हार्पणभोग नुरे तोही ।। ४ ।।

३५ पाहणें परिसणें नादरूपीं गेलें । निराकार ठेलें एकतत्त्वेंशीं ।।१।। एकतत्त्वेंशीं हरि एकरूप माझा । भिन्नभाव दुजा नाहीं नाहीं ।। २ ।। संग परिकर सांपडला आम्हां । सर्व आत्माराम पूर्णपणें ।।३।। सोपान देव्हडें मन माजिवडें । ब्रह्मांड एवढें गिळीयेले ।।४।।

३६ आत्मरूप सुख आत्मपणें चोख । निर्गुणीचें चोख सगुण जालें ।। १ ।। रूप अरूप रूपासाजीं सर्व । रूपीं भावाभाव नाठवती ।।२।। बुडालें सगुण नाहीं मीतूंपण । अंतरींची खूण मावळली ।।३।। सोपान गुरूतें ब्रह्म पुरतें । पुसोनि आरुतें ठाकीयलें ।। ४ ।।

३७ उघडी दृष्टि करी इंद्रियांसकट । वैकुंठीची वाट पंढरी जाण ॥१॥ दृष्टिभरी पाहे विठ्ठल दैवत । पूर्ण मनोरथ विठ्ठलदेवें ॥२॥ हाचि मार्ग सोपा जनांसी उघड । विषयाचें जाड टाकीं परतें ॥३॥ सोपान म्हणे गुंफिसी सर्वथा । मग नव्हे उलथा भक्तिपंथें ॥ ४ ॥

३८ पृथ्वी सोंवळी आकाश सोंवळें । मन हें वोवळें अभक्तांचें ॥ १ ॥ ब्रम्ह हें सोंवळें न देखों वोवळें । असों खळें मेळें ईये जनी ॥२॥ ब्रम्हाड पंढरी सोंवळी हे खरी । तारीसी निर्धारीं एका नामें ॥ ३ ॥ सोपान अखंड सोंवळा प्रचंड । न बोले वितंड हरीविण ॥ ४ ॥

३९ मन आधीं मुंडीं वासनेतें खंडीं । विठ्ठल ब्रह्मांडीं एक आहे ॥ १ ॥ मन हें सोंवळें सदा शौच करी । तुज निरंतरी हरि पावे ॥ २ ॥ विवेकवैराग्य ज्ञानाचें सौभाग्य । सोंवळा आरोग्य हरि देख ॥ ३ ॥ सोपान नेणें सलगीचा सोंवळा । नित्य वेळोवेळां स्मरे हरि ॥ ४ ॥

४० शरीर निर्मळ वासना टवाळ । कां रे तूं बरळ भक्तीवीण ॥१॥ सर्व ब्रह्म हरि नेणसि सोंवळें । एकाचि गोपाळें जनवन ॥२॥ आपपृथ्वीतेजवायु आणि व्योम । पंचभूतीं सम वर्ततसे ॥३॥ सोपान म्हणे गुरूचा उपदेश शुद्ध । तरीच वासना प्रबुद्ध तया नरा ॥ ४ ॥

४१ सागरींचें तोय जगा निवारितु । मागुतें भरित पूर्णपणें ॥१॥ तैसे आम्ही दास तुज माजीं उदास । तूं आमचा निवास सर्व देवा ॥ २ ॥ तुजमाजीं विरों सुखदुःख विसरों । तुझ्या नामें तरों येचि जन्मीं ॥३॥ सोपान निकट बोलोनि सरळ । तुष्टला गोपाळ अभय देत ॥ ४ ॥

४२ मी माझी कल्पना पळाली वासना । जनीं जनार्दना सेवीतुसे ॥ १ ॥ तूं तंव संपन्न आमुचें हो धन । सांगितली खूण निवृत्तिदेवीं ॥२॥ तुजमाजीं प्रेम गेलें सप्रेमें । जपव्रतनेम हारपले ॥३॥ सोपान सगळा न दिसे इहीं डोळां । तूंचि बा गोपाळा आत्माराम ॥४॥

४३ तुझा तूंचि थोर तुज नाहीं पार । आमुचा आचार विठ्ठल देवो ॥ १ ॥ आपीं सधर सर्व हा श्रीधर । सर्व कुळाचार पांडुरंग ॥ २ ॥ नदिसे दुसरें निर्धारितां खरें । श्रीगुरुविचारें कळलें आम्हां ॥ ३ ॥ सोपान म्हणे रखुमादेवीवर । तूंचि आमुचें पर कुळवटीं ॥ ४ ॥

४४ हरिविण दुजें नावडे पै दैवत । जरी समर्थ बोले सृष्टि ॥ १ ॥ हरिराम गोविंद नित्य हाचि छंद । हृदयीं आनंद प्रेमबोधु ॥ २ ॥ हरि हेंचि दैवत समर्थ पैं आमुचें । बोलणें वेदांचें बोलती मुनी ॥३॥ सोपान अलगटु नामपाठ वाचे । नित्य विठ्ठलाचे चरण हृदयीं ॥ ४ ॥

४५ हरीवीण भावो न धरावा पोटीं । सर्वभावें सृष्टि एका तत्वें ॥ १ ॥ तत्वतां श्रीहरि सर्वांघटीं आहे । उभारोनि बाहे वेद बोले ॥ २ ॥ हरीवीण नाहीं जीवशिव पाही । शिवाच्या हो देहीं आत्मा हरि ॥ ३ ॥ सोपान म्हणें हरीवीण नाहीं तत्व । हरि हाचि सर्वत्र सर्वां वसे ॥ ४ ॥

४६ हरि नांदे देहीं ऐसा भावो आहे । परतोनि पाहे अरे जना ॥१॥ परतलिया दृष्टि चैतन्याची सृष्टि । नामेंचि वैकुंठीं पावे जना ॥ २ ॥ हा बोध श्रीरंगें अर्जुना उपदेशु । सर्व हृषीकेशु सर्वांरूपीं ॥ ३ ॥ सोपानधारणा हरि नांदे सर्वत्र । त्याचेंचि चरित्र क्षरलेंसे ॥ ४ ॥

४७ हरि असे देहीं हाचि भावो खरा । वायां तूं सैरा धांवूं नको ॥ १ ॥ धांवतां अवचटें पडशील व्यसनीं । संसारघसणीं योनिमाळे ॥ २ ॥ हरि हेंचि ध्यान निरंतर करी । बाह्य अभ्यंतरीं एकु राम ॥३॥ सोपान म्हणे राम नांदे सर्वांघटीं । विश्वीं जगजेठीं क्षरलासे ॥ ४ ॥

४८ हरिनाम जपें सहस्त्रवरि सोपें । जातील रे पापें अनंतकोटी ॥ १ ॥ हरिवीण नाम नाहीं पां रे सार । दुसरा विचार करूं नको

।।२।। हरिध्यान चोख पवित्र परिकर । नित्यता शंकर हरिध्यानी ।। ३ ।। सोपान म्हणे हरि जप करा रे सर्वथा । न पावाल व्यथा भवजाळीं ।। ४ ।।

४९ ज्याचे मुखीं हरि तोचि धन्य जगीं । तरला पै वेगीं वेदु बोले ।। १ ।। हरि हाचि आम्हां तत्त्व पैं सोहपें । हरितील पापें हरिनामें ।। २ ।। वैकुंठींचें सुख नलगे पैं चित्तीं । हरि हेचि मूर्ति विठ्ठल ध्यावी ।।३।। याचेनि स्मरणें कैवल्य साचार । सोपानविचार हरि जपे ।। ४ ।।

---

# मुक्ताबाईचे अभंग

१ सर्वी सर्वसुख अहंतेचि दुःख । मोहममताविष त्यजीयेले ।।१।। साधकबाधक करूनि विवेक । मतिमार्गतर्क शोधियेला ।।२।। सर्व-तीर्थ हरि दुधाळु धेनुवा । वोळला कणवा चातकाचा ।।३।। सूक्ष्म मार्ग त्याचा भक्त देही मायेचा । आकळावयाचा सत्व धरी ।।४।। वेद जंव वाणी श्रुति रूपें कहाणी । ऐकों जाय कर्णी तंव परता जाय ।।५।। मुक्ताई सोहंभावें तनु भरलें दिसे देवें । मूर्तामूर्त सोहंवे हरी घोटी ।। ६ ।।

२ करणें जंव कांहीं करूं जाये शेवट । तंव पडे आडवाट द्वैत-भावें ।।१।। राहिलें करणें नचले पैं कर्म । हरीविण देहधर्म चुकताहे ।।२।। मोक्षालागीं उपाय करितोसि नाना । तंव साधनीं पतना पडों पाहे ।।३।। मुक्ताई करि हरिश्रवणपाठ । तेणें मोक्षमार्ग नीट सकळ साधे ।। ४ ।।

३ ऊर्णाचिया गळां बांधली दोरी । पाहों जाय घरीं तंव तंतु नाहीं ।।१।। तैसें झालें बाई जंव एकत्व नाहीं । दुजी जंव साई तंव हें अंध ।। २ ।। ऐसी मी वो अंध जात होतें वायां । प्रकृति सावया

पावली तेथें ॥ ३ । मुक्ताई सावध करि निवृत्तिराज । हरिप्रेम उमज एकतत्वें ॥ ४ ॥

४ शांतिक्षमा वसे देहीं देव पैसे । चित्त समरसें मुक्तमेळु ॥१॥ निर्गुणें उपरमु देव पुरुषोत्तमु । प्रकृतिसंगमु चेतनेचा ॥२॥ सज्ञानीं दिवटा अज्ञानीं तो पैठा । निवृत्तीच्या तटा नेतु भक्ता ॥ ३ ॥ मुक्ताई दिवस अवघा हृषीकेश । केशवेंविण वास शून्य पैसे ॥४॥

५ प्रकृति निर्गुण प्रकृति सगुण । दीपें दीप पूर्ण एका तत्वें ॥१॥ देखिलें गे माये पंढरी पाटणीं । पुंडलिका आंगणीं विठ्ठलराज ॥२॥ विज्ञानेंसि तेज सज्ञानेंसि निज । निर्गुणेंसि चोज केलें सये ॥ ३ ॥ मुक्ताई तारक सम्यक विठ्ठल । निवृत्तीनें चोखाळ दाखविलें ॥४॥

६ शून्यापरतें पाही तंव शून्य तेंही नाहीं । पाहाते पाहोनि ठायीं ठेवियलें ॥१॥ कैसा गे माये हा तारकु दिवटा । पंढरी वैकुंठा प्रगटला ॥२॥ नकळे याची गति आदिमध्यअंतीं । जेथें श्रुति नेति नेति प्रगटल्या ॥ ३ ॥ मुक्ताई सप्रेम विठ्ठलसंभ्रम । शून्याहि शून्यसम तेजबाज ॥ ४ ।

७ प्रारब्ध संचित आचार गोमटे । निवृत्तितटाकें निघालों आम्हीं ॥१॥ मुळींचा पदार्थ मुळींच पैं गेला । परतोनि अबोला संसारासी ॥२॥ सत्यमिथ्याभाव सत्वर फळला । हृदयीं सामावला हरिराज ॥३॥ अव्यक्त आकार साकार हे स्फूर्ति । जीवशिवप्राप्ति ऐसें केलें ॥ ४ ॥ सकामनिष्कामवृत्तीचा निज फेर । वैकुंठ आवार दाखविलें ॥५॥ मुक्तलग मुक्त मुक्ताईचें तट । अवघेंचि वैकुंठ निघोट रया ॥ ६ ॥

८ नामबळें देहीं असोनि मुक्त । शांति क्षमा चित्त हरिभजनें ॥१॥ दया धरा चित्तीं सर्वभूतीं करुणा । निरंतर वासना हरिरूपीं ॥२॥ माधव मुकुंद हरिनाम चित्तीं । सर्व पैं मुक्ति नामपाठें ॥३॥ मुक्ताईचें धन हरिनामें उच्चारु । अवघाचि संसारु मुक्त केला ॥ ४ ॥

९ सर्वरूपीं निर्गुण संचलें पै सर्वदां । आकार संपदा नाहीं तया ।।१।। आकारिती भक्त मायामय काम । सर्वत्र निःसीम अतरीं आहे ।। २ ।। वृत्तीचा उच्छेदु निवृत्ति तस्वतां । सर्वही समता सांगितली ।। ३ ।। मुक्ताई अवीट मुक्तपंथरत । जीवीं शिवीं अनंत तत्वविद ।। ४ ।।

१० सहस्रदळीं हरि आत्मा हा कुसरी । नांदे हा भीतरीं अलिप्त सदां ।।१।। रविबिंब बिंबे घटमठीं सदा । तें नातळे पैं कदां तैसा आत्मा ।।२।। अलिप्त श्रीहरि सेवी कां झडकरी । सेवितां लवकरी हरीच हो आल ।।३।। चंदनाच्या दृतीं वेधल्या वनस्पती । तैसें आहे संगती या हरिपाठे ।। ४ ।। मुक्ताई चिंतीत चिंतामणी चित्तीं । इच्छिलें पावती भक्त सदां ।। ५ ।।

११ देउळाच्या कळसीं नांदे एक ऋषी । तया घातली पुशी योगेश्वरीं । दिवसां चांदिणें रात्रीं पडे उष्ण । कैसेंनि कठिण तत्व जालें ।। २ ।। ऋषी म्हणे चापेंकळि काळ पैं कापे । प्रकाशदीपें निघोनि जाये ।। ३ ।। ठायीं ठायीं असे पाहतां न दिसे । मनाच्या धारसें एक होय ।। ४ ।। एकएकलें वायांचि पैं गुंतले । मुक्त पै वाहिलें सहज असे ।। ५ ।। वैकुंठ अविट असोनि प्रगट । वायांची आडवाट मुक्ताई म्हणें ।। ६ ।।

१२ अलिप्त संसारीं हरि नामपाठें । जाईजे वैकुंठें मुक्तलग ।। १ ।। हरिविण मुक्त नकरी हो सर्वदां । संसारआपदा भव तोडी ।। २ ।। आशेच्या निराशीं अचेतना मारी । चेतविला हरि आपरूपें ।। ३ ।। मुक्ताई जीवन्मुक्तचि सर्वदा । अभिन्न पैं भेदा भेदियलें ।। ४ ।।

१३ अविट न विटे हरीचे हे गुण । सर्व सनातन ध्यातां रूपें ।।१।। साध्य हें साधन हरिरूपें ध्यानें । रामकृष्णकीर्तनें मुक्त आम्हीं ।।२।। असंगेंचि नटु नटलों पैं साचें । नाहीं त्या यमाचें भय आम्हां ।। ३ ।। मुक्ता पूर्णता मुक्ताई लाधली । साधन दिधली चांगयासी ।। ४ ।।

१४ आदिमध्यऊर्ध्व मुक्त हरि भक्त। सबाह्य अंतरीं हरि एकु ॥ १ ॥ नलगती तीर्थें हरिरूपें मुक्त। अवघेंचि सूक्त जपियेलें ॥ २ ॥ ज्याचे नामें मुक्त पैं जडमूढ। तरले दगड समुद्रीं देखा ॥ ३ ॥ मुक्ताई हरिनामें सर्वदां पैं मुक्त। नाहीं आदिअंत उरला आम्हां ॥ ४ ॥

१५ मुक्तपणें ब्रीद बांधोनीयां द्विज। नेणती ते बीज केशवहरि ॥१॥ ज्याचेनि मुक्तता सर्वही पैं मुक्त। करूनियां रत न सेविती ॥ २ ॥ वेद बोलियेले ब्रह्मार्पणें भावें। सदा मुक्त व्हावें अरे जना ॥३॥ मुक्ताई मुक्त हरिनाम सेवीत। अवघेचि मुक्त सेविता हरि ॥ ४ ॥

१६ मुक्तामुक्त दोन्ही नाइकतो कर्णीं। हरिनामपर्वणी सदाकाळ ॥ १ ॥ नाहीं काळ तेथें आम्हां वेळ कैंची। हरिनामछंदाची गोडी थोरी ॥२॥ नाना विघ्नबाधा नाइकों आम्हीं कदा। निरंतर धंदा रामकृष्ण ॥३॥ मुक्तपणें मुक्त मुक्ताई पैं रत। हरिनाम स्मरत सर्व काळ ॥ ४ ॥

१७ मुक्त पैं अखंड त्यासीं पैं फावलें। मुक्तचि घडलें हरीच्या पाठें ॥१॥ रामकृष्ण मुक्त जाले पैं अनंत। तरले पतीत युगानुयुगीं ॥ २ ॥ कृष्ण नामें जीव झाले सदाशिव। वैकुंठ राणीव मुक्त सदा ॥३॥ मुक्ताई संजीवन मुक्त मुक्तिकोडें। जालें पैं निवाडें हरिरूप ॥ ४ ॥

१८ भजनभावो देहीं नित्य नामपैठा। नामेंचि वैकुंठा गणिका गेली ॥१॥ नाममंत्र आम्हां हरिरामकृष्ण। दिनदिशीं प्रश्न मुक्त-मार्गु ॥ २ ॥ नामचि तारकु तरले भवसिंधु। हरिनामछंदू मंत्रसार ॥३॥ मुक्ताई चिंतन हरिप्रेम पोटीं। नित्य नाम घोटी अमृत सदा ॥ ४ ॥

१९ नाममंत्रें हरि निजदासां पावे। ऐकोनी ध्यावे झडकरी ॥ १ ॥ सुदर्शन करीं पावे लवकरी। पांडवां साहाकारी श्रीकृष्ण

रया ॥२॥ निजानंद दावी उघडें पैं वैकुंठ । नामेंचि प्रगट आम्हां-लागीं ॥ ३ ॥ मुक्ताई जीवनन्मुक्त हा संसार । हरि पारावर केला आम्हीं ॥४ ॥

२० अंतरबाह्य निकें सर्व इंद्रियांचें चोज । निजीं निजबीज एकतत्व ॥ १ ॥ आदि नाहीं अनादि नाहीं । तें रूप पाहीं अविट बाईये ॥ २ ॥ मुक्ताई संजीवन तत्वतां निर्गुण । आकार सगुण प्रपंचींचा ॥ ३ ॥

२१ चित्तासी व्यापक व्यापूनि दूरी । तेंचि माजीघरीं नांदे सदां ॥ १ ॥ दिसे मध्य सुख मुक्तलग हरि । शांति वसे घरीं सदोदित ॥ २ ॥ नाहीं या शेवट अवघाची निघोट । गुरुतत्वें वाट चैतन्याची ॥ ३ ॥ मुक्ताई संपन्न मुक्त पै शेजुलें । सर्वत्र उभविलें मुक्त चोख ॥ ४ ॥

२२ परब्रह्मी चित्त निरंतर धंदा । तया नाहीं कदां गर्भवास ॥ १ ॥ उपजोनीं जनीं धन्य ते योनी । चित्त नारायणीं मुक्तलग ॥२॥ अव्यक्त पै व्यक्ति चित्तासीं अनुभव । सर्व सर्वीं देव भरला दिसे ॥३॥ ज्ञेय ज्ञाता ज्ञान उन्मनों विज्ञान । चित्त नारायण जालें त्याचें ॥४॥ आदि अंतीं हरि सर्व त्याचा जाला । परतोनी अबोला प्रपंचेसी ॥ ५ ॥ मुक्ताईचें चित्त निरंतर मुक्त । हरि हेंचि संचित आम्हां घरीं ॥ ४ ॥

२३ मुक्तलगचित्तें मुक्त पै सर्वदा । रामकृष्णगोविंदा वाचे नित्य ॥ १ ॥ हरि हरि छंदु तोडी भवकंदु । नित्य नामानंदु जपे रया ॥२॥ सर्वत्र रूपडें क्षरलेंसे दृश्य । ज्ञाता ज्ञेय भास हरीमाजीं ॥३॥ मुक्ताई सधनरूप हरिचित्तीं । संसारसमाप्ति हरीच्या नामें ॥ ४ ॥

२४ मुक्तपणें सांग देवो होय देवांग । मीपणें उद्वेग नेघे रया ॥ १ ॥ वाउगें मीपण आथिलें प्रवीण । एक नारायण तत्व खरें ॥ २ ॥ मुक्तामुक्ती दोन्ही करी कां रे शिराणी । द्वैताची कहाणी

नाहीं तुज ॥३॥ मुक्ताई अद्वैत द्वैतीं द्वैतातीत। अवघाचि अनंत दिसे देहीं ॥ ४ ॥

२५ मनें मन चोरी मनोमय धरी। कुंडली आधारीं सहस्रदळीं ॥१॥ मन हें वोगरु आदि हरिहरु। करी पाहुणेरु आदिरूपा ॥२॥ साविया विसरू घेसील पडिभरु। गुरुकृपा विरु विरे सदा ॥ ३ ॥ मुक्ता मुक्ति चित्तें गुरुमार्गं विते। पावन त्यरिते भावीं भाव ॥४॥

२६ विश्रांति मनाची निजशांति साची। मग त्या यमाची भेटी नाहीं ॥ १ ॥ अधिकारी मन मग सारी स्नान। रोकडेंचि साधन आलें हातां ॥२॥ साधिलें साधन नित्य अनुष्ठान। चित्तीं नारायण मंत्र जपे ॥ ३ ॥ मुक्ताई प्रवीण नारायण धन। नित्य मंत्रस्नान करी वेगीं ॥४॥

२७ पूजा पूज्यवित्तें पूजक पैं चित्तें। घाली दंडवतें भावशीळ ॥१॥ चंपकसुमनें पूजी कातळीनें। धूपदीप मनें मानसीं कां ॥२॥ भावातीत भावो वोगरी आरावो। पाहुणा पंढरीरावो हरी माझा ॥ ३ ॥ मुक्ताई संपन्न विस्तारूनि अन्न। सेवी नारायण हरिराजा ॥ ४ ॥

२८ देउळीचा देवोघरभरी भावो। कळसेंवीण वावो जातु असें ॥१॥ जाताति वाउगे नटनाट्यसोंगें। चित्त अनुरागें भजती ना ॥२॥ असोनि न दिसें उगयाचि पिसें। घेती वायां वसे सज्जनेंवीण ॥३॥ रावो रंक कोहं न म्हणेचि सोहं। साकारलें अहं नकळे तया ॥४॥ भ्रांतीचेनि भूली वायांचि घरकुली। माया आड ठेली अरे रया ॥ ५ ॥ मुक्ताई परेसि दुभतें चहूंसी। सत्रावी सर्वरसीं एका देवें ॥ ६ ॥

२९ आदिमध्यअंतु न कळोनि प्रांतु। असे जो सततु निजतत्वें ॥ १ ॥ कैसेनि तत्वतां तत्व पैं अनंता। एकतत्व समता आपेंआप ॥२॥ आप जंव नाहीं पर पाहासी काई। विश्वपणें होई निजतत्वीं ॥३॥ माजीं मजवटा चित्त नेत तटा। परब्रम्हवैकुंठा चित्तानुसारें

॥४॥ मुक्ताई सांगाती मुक्तनामपंक्ति । हरिनामें शांति प्रपंचाची ॥ ५ ॥

३० व्यक्त व्यक्तीचें रूपस मोहाचें। एकतत्व दीपाचें हृदयीं नांदे ॥ १ ॥ चांगया फावलें फावोनि घेतलें । निवृत्तीनें दिधलें आमुच्या करीं ॥ २ ॥ आदिमध्य यासी सर्वत्र निवासी। एकरूपें निशी दवडितु ॥ ३ ॥ मुक्ताई पूर्णता एके रूपें चित्ता। आदिअंतु कथा साधियेली ॥४॥

३१ पूर्णपणें सार अविट आचार। सारासारविचार निजतेजें ॥ १ ॥ निर्गुणीं आकार सर्वत्र साकार। एकरूपें विचार निजतेजें ॥२॥ मुक्ताई चैतन्यें अवघेचि घन। आदिअंतुखुण निवृत्तीची ॥३॥

३२ जेथें जें पाहे तेथें तें आहे। उभारोनि बाहे वेद सांगे ॥१॥ सोमकांतीं झरा कोठील दुसरा। तत्वीं तत्व धरा निजदृष्टीं ॥२॥ हेतुमातु आत्मा अवघाचि परमात्मा। सोहंभावें सोहं आत्मा सर्वी असे ॥३॥ मुक्तलगखुण मुक्ताई प्रमाण। देहीं देहो सौजन्य निज तेजें ॥४॥

३३ दिवसां शीतळ निशीयेसी बरळ। अधःऊर्ध्व केवळ निजबीज ॥ १ ॥ या आदि नाहीं अनादि माहीं। कैचा मोहो प्रवाहीं दिसेचिना ॥ २ ॥ शक्तीचे संपुष्टीं मुक्तामुक्त घट। अवघें वैकुंठ दिसताहे ॥ ३ ॥ मुक्ताईपरिपाक अवघें रूप एक। देखिलें सम्यक सोहंभावें ॥ ४ ॥

३४ आदिअंतु हरि सर्वांघटीं पूर्ण। जाणोनि संतजन प्रेम भरित ॥ १ ॥ रामनाम चित्तें प्रेम वोसंडत। नित्यानित्य तृप्त हरिभक्ति ॥ २ ॥ शांतिक्षमादया सावध पैं चित्त। आनंदें डुल्लत सनकादिक ॥ ३ ॥ मुक्ताई म्हणे नाम श्रीहरीचें जोडी। नित्यता आवडी चरणसेवे ॥४॥

३५ निर्गुणाची सेज सगुणाची बाज। तेथें केशीराज पहुडले ॥१॥ कैसें याचें करणें दिवसां चांदिणें। सांवळें उटणें एका तत्वीं

॥ २ ॥ नाहीं या ममता अवघीच समता । आदिअंतु बिंबता नलगे वेळु ॥ ३ ॥ मुक्ताई सघन सर्वत्र नारायण । जीवशिवसंपन्न एका तत्वें ॥ ४ ॥

३६ मुक्तामुक्तकोडें पाहिलें निवाडें । ब्रह्मांडाएवढें महत्तत्व ॥१॥ निजतत्व आप अवघाचि पाक । एका रूपें दीपक लावियेला ॥ २ ॥ आदि मध्य निज निर्गुण सहज । समाधि निजतेज आत्मारामू ॥ ३ ॥ मुक्ताईचें धन आत्माराम खुण । देखिलें निदान हृदयघटीं ॥४॥

३७ विस्तारूनि रूप सांगितलें तत्वीं । कैसेनि परतत्वीं वोळखी जाली ॥ १ ॥ सोहंभावठसा कोणते पेठा । उभाउभी वाटा कैसा जातु ॥ २ ॥ या नाहीं सज्ञान हा अवघाचि ज्ञान । आपरूप धन सर्वांरूपीं ॥ ३ ॥ मुक्ताई मुक्तता सर्वपणें पुरता । मुक्तामुक्ति अपैता निजबोधें ॥४॥

३८ उजियेडु कोडें घेतसों निवाडें । आपुलिये चाडें जीवनळा ॥१॥ एकरूप दिसें सर्वांघटीं भासें । एक हृषीकेशें व्यापियेलें ॥२॥ त्रिपुटी भेदूनी सर्वत्र गामिनी । एका रूपें मोहिनी तेही सदा ॥३॥ नित्यता उन्मत्त अवघेंचि भरित । एकतत्वें भावित सोहंभावें ॥४॥ मुक्ताई सांगती कैसेनि गुंपती । मायादेवीसमाप्ति निजतत्वीं ॥५॥

३९ मुक्तजीव सदा होती पैं नामपाठें । तेंचि रूप इटे देखिलें आम्ही ॥ १ ॥ पुंडलिकें विठ्ठल आणिला पंढरी । आणुनी लवकरी तारिले जन ॥ २ ॥ ऐसें पुण्य केलें एका पुंडलिकेंची । निरसिली जनाची भ्रमभुली ॥ ३ ॥ मुक्ताई चिंतनें मुक्त पैं जाली । चरणीं स्थिरावली हरिपाठें ॥४॥

४० नादाबिंदा भेटी जे वेळीं पैं जाली । ऐशी एकी बोली बोलतों जीव ॥१॥ उगेचि मोहन धरुनि प्रपंचीं । त्यासी पैं यमाची नगरी आहे ॥२॥ जीवजंतु जड त्यासी उपदेशीं । त्यासी गर्भवासी

घाली देवो ।। ३ ।। मुक्ताई श्रीहरि उपदेशी निवृत्ति । संसार पुढती नाहीं आम्हां ।। ४ ।।

४१ आधीं तूं मुक्त होतासी रे प्राणिया । परी वासने पापीणिया । नाडिलासी । आधींचें आठवी मग घेई परी । हरिनाम जिव्हारी मंत्रसार ।। १ ।। आदि मध्य हरि उर्ध्व पै वैकुंठ । जाईल वासना हरि होईल प्रगट ।। २ ।। एक तत्व धरी हरिनाम गोड । येर तें काबाड विषय ओढी । नाम तें सांडी मासनापापिणीं । एक नारायणीं चाड धरी ।। ३ ।। मुक्ताई मुक्तलग सांडिली वासना । मुक्तामुक्ती राणा हरिपाठें ।। ४ ।। नामाचे निर्धांटें जळती पापराशी । न येती गर्भवासीं अरे जना ।।५।।

४२ गुंगी उडाली आकाशीं । तिणें गिळिलें सूर्यासी ।।१।। थोर नवलाव जाहला । वांझे पुत्र प्रसवला ।।२।। विंचु पाताळसी जाय । शेष माथां वंदी पाय ।। ३ ।। माशी व्याली घार झाली । देखोनि मुक्ताई हांसली ।।४।।

## क्षेपक ( ताटीचे ) अभंग

१ योगी पावन मनाचा । साही अपराध जनाचा ।। १ ।। विश्वरागें झाले वन्ही । संतें सुखें व्हावें पाणी ।। २ ।। शब्द शास्त्रें झाले क्लेश । संतीं मानावा उपदेश ।। ३ ।। विश्वपट ब्रह्मदोरा । ताटी उघडा ज्ञानेश्वरा ।।४।।

२ सुखसागरीं वास झाला । उच्च–नीच काय त्याला ।। १ ।। अहो आपण जैसे व्हावें । देवें तैसेंचि करावें ।।२।। ऐसा नटनाट्य खेळ ।। स्थिर नाहीं एकवेळ ।। ३ ।। एकापासूनी अनेक झाले । त्यासी पाहिजे सांभाळिलें ।।४।। शून्य साक्षित्वें समजावें । वेद ॐकाराच्या नांवें ।। ५ ।। एकें उंचपण केलें एक अभिमानें गेलें ।।६।। इतुकें टाकुनि शांति धरा । ताटी उघडा ज्ञानेश्वरा ।।७।।

३ वरी भगवा झाला नामें । अंतरीं वश्य केला कामें ॥ १ ॥ त्याला म्हणूं नये साधू । जगीं विटंबना बाधू ॥ २ ॥ आपआपणा शोधुन घ्यावें । विवेक नांदे त्याच्यासवें ॥ ३ ॥ आशा दंभ अवघे आंवरा । ताटी उघडा ज्ञानेश्वरा ॥४॥

४ संत तेचि जाणा जगीं । दया क्षमा ज्यांचे आंगीं ॥१॥ लोभ अहंता नये मना । जगीं विरक्त तोची जाणा ॥ २ ॥ इहपर लोकीं सुखी । शुद्धज्ञान ज्याचे मुखीं ॥३॥ मिथ्या कल्पना मागें सारा । ताटी उघडा ज्ञानेश्वरा ॥४॥

५ एक आपण साधु झाले । येर कोण वाया गेले ॥ १ ॥ उठे विकार ब्रह्मीं मूळ । अवघे मायेचे गाबाळ ॥२॥ माया समूळ नुरे जेव्हां । विश्वब्रह्म होईल तेव्हां ॥ ३ ॥ ऐसा उमज आदीं अंतीं । मग सुखी व्हावें संतीं ॥ ४ ॥ चिंता क्रोध मागें सारा । ताटी उघडा ज्ञानेश्वरा ॥५॥

६ ब्रह्म जैसें तैशापरी । आम्हां वडील भूतें सारीं ॥ १ ॥ हात आपुला आपणा लागे । त्याचा करूं नये खेद ॥२॥ जीभ दांतांनीं चाविली । कोणें बत्तिशी तोडिली ॥३॥ थोर दुखावलें मन । पुढें उदंड शाहाणे ॥ ४ ॥ चणे खावें लोखंडाचें । मग ब्रह्मपदीं नाचे ॥५॥ मन मारुनी उन्मन करा । ताटी उघडा ज्ञानेश्वरा ॥६॥

७ सुखसागर आपण व्हावें । मन बोधें निववावें ॥ १ ॥ बोधा करूं नये अंतर । साधूं नये आपपर ॥२॥ जीव जीवासी पैं द्यावा । मग करूं नये हेवा ॥ ३ ॥ तरणोपाय चित्तीं धरा । ताटी उघडा ज्ञानेश्वरा ॥४॥

८ अहो क्रोधें यावें कोठें । अवघे आपण निघोटें ॥ १ ॥ ऐसें कळलें उत्तम । जन तेची जनार्दन ॥ २ ॥ ब्रीद बांधिलें चरणीं । नये दावितां करणी ॥ ३ ॥ वेळ क्रोधाचा उगवला । अवघा योग फोल झाला ॥ ४ ॥ ऐशी थोर दृष्टी धरा । ताटी उघडा ज्ञानेश्वरा ॥५॥

९ सांडी कल्पना उपाधी । तीच साधूला समाधी ॥१॥ वाद घालावा कवणाला । अवघा द्वैताचा हो घाला ॥२॥ पुढें उमजेना काय । उडत्याचे खालीं पाय ॥ ३ ॥ एक मन चेष्ट करी । भूते बापुडीं शेजारीं ॥ ४ ॥ अवघी ईश्वराची करणी । काय तेथें केलें कोणी ॥५॥ पुन्हां शुद्ध मार्ग धरा । ताटी उघडा ज्ञानेश्वरा ॥६॥

१० गिरीगव्हारें कशासाठीं । रागें पुरवीली पाठी ॥ १ ॥ ऐसा नसावा संन्यासी । परमार्थाचा जो कां द्वेषी ॥ २ ॥ घर बांधिलें डोंगरीं । विषया हिंडे दारोदारीं ॥ ३ ॥ काय केला योगधर्म । नाहीं अंतरी निष्काम ॥ ४ ॥ गंगाजळ हृदय करा । ताटी उघडा ज्ञानेश्वरा ॥५॥

११ शुद्ध ज्याचा भाव झाला । दुरी नाहीं देव त्याला ॥१॥ अवघीं साधनें हातवटीं । मोलें मिळत नाहीं हाटीं ॥ २ ॥ अहो आपण तैसें व्हावें । अवघें अनुमानूनीं घ्यावें ॥ ३ ॥ ऐसें केलें सद्‍गुरुनाथें । बाप रखुमादेवी कांतें ॥ ४ ॥ तेथें कोणी शिकवांवें । सार साधुनियां घ्यावें ॥ ५ ॥ लडीवाळ मुक्ताबाई । जीव मुद्गल ठायीचे ठायीं ॥ ६ ॥ तुम्ही तरून विश्व तारा । ताटी उघडा ज्ञानेश्वरा ॥७॥

---

# श्री चांगदेवाचे अभंग

१ नोवरीचे हातीं चित्रीव काठी । नोवरी लागे संन्याशापाठीं ॥ १ ॥ नारायण म्हणा नारायण म्हणा । नारायण म्हणा वो नोवरीये ॥ २ ॥ विश्वरूप नोवरी संन्याशा रातली । त्या आम्हां भली सोयरीक जाली ॥ ३ ॥ दिगंबर नोवरा क्षपणिक वऱ्हाडी । वटेश्वरचांगा वाहातो लुगडीं ॥४॥

२ सासूचे आधीं सून जन्मली । सून मारून सासू वो नोवरी जाली ॥ १ ॥ आचोजीं चोजवितलें । तें स्वर्गीं जाणवलें रे भाई

॥ २ ॥ पुत्र पितियाचा व्रतबंध करी । वांझ सासू कन्यादानजे नोवरी ॥३॥ सिद्धांतींचें वर्म अनुभवीं जाणें । वटेश्वरचांगा बोला खुणें ॥ ४ ॥

३ आत्मा हा नोवरा कुडी हे नोवरी । निंबलोण करी वोहरासी ॥ १ ॥ सोहळा जाला नोवरा गांवा गेला । वेगीं आइती करा नोवरी बोलावा ॥ २ ॥ न्हाणिली धुणिली गजस्कंधीं मिरविलीं । बोळवीत गेली चौघेंजणें ॥३॥ ज्याची नोवरी त्याहातीं लाविली । चांगा म्हणे आता निश्चिती झाली ॥ ४ ॥

४ वऱ्हाडी आले संसारनगरा । चांगा नोवरा केळवला ॥ १ ॥ हातीं कांकण उभा वटेश्वरीं । शांति हे नोवरी पर्णावया ॥ २ ॥ पर्णिली शांति बैसली पाटीं । मुक्ताई करवली हळदुली वांटी ॥ ३ ॥

५ नोवरीच्या गळां तुळशींच्या माळा । वऱ्हाडी सकळां तुम्हीं व्हावें ॥ १ ॥ मांडला आपुला मांडला आपुला । मांडला आपुला घराचार ॥ २ ॥ वरमायेचें चिरवो हो माय नेसली । त्या आम्हां भली सोयरिक जाली ॥ ३ ॥ वटेश्वर चांगा नोवरीचे पाठीं । सनकादिक गोष्टी करितातो ॥४॥

६ कुडी हे नोवरी आत्मा हा नोवरा । दोघें पर्णू जाती निरंतर ॥१॥ पांचही प्राण सर्वही वऱ्हाडी। आशा तृष्णा दोन्ही देशधडी ॥ २ ॥ शांति निवृत्ति दोघी सुवासिनी । भक्ति करवली सखी बहिणी ॥ ३ ॥ वटेश्वर चांगा वर धवा । तुम्हीं नेऊनि मध्यें बैसवा ॥४॥

७ सोहं न बुद्धि पै वेगळें । अहं सांठविलें बाईयांनो ॥१॥ अहं मथितां सोहं आलें । अविद्यामायें व्यापियलें ॥२॥ अहंकार सांडी बोध पैं जाला । चांगया मोहिला चांगदेवें ॥३॥

८ मनसंकल्प शुद्ध पैं नव्हे । येऱ्हवीं सदोदित आहे चिदानंदीं ॥ १ ॥ मनातें बुडवुनी इंद्रियातें दंडुनी । मी हें सोडुनी सोहं धरी

॥ २ ॥ चांगा वटेश्वरीं सोहं जाला । अवघाचि बुडाला ज्ञानडोहीं ॥ ३ ॥

९ महज्जममाजि बैसला योगी । सुषुम्नामार्गी निरोधोनियां ॥१॥ गोल्हाटमंडळ भेदोनियां जाय । नाहीं तें पाहे डोळेभरी ॥ २ ॥ चांगा वटेश्वर सोहं जाला । अवघाचि गिळियेला बाईये वो ॥३॥

१० निरंजनवनीं केशव फुलला । डोंगर शोभला ब्रम्हगिरी ॥ १ ॥ तेथें सुमन ज्ञाडीन अनु हातें । शिष्ट अनुभवूनि बुद्धि तोचि जाला ॥ २ ॥ चांगा वटेश्वरीं केशव फुलला । भ्रमर जाला रस घ्यावया ॥ ३ ॥ .

११ रावळींचे कर चुकले जाण । गिवसितातीं साहीजणें वेळोवेळां ॥ १ ॥ करीं कर धरियला मुष्टीं । करें सामावलें अपत्या दृष्टीं ॥ २ ॥ मुक्ताई करें लेईलें अंजन । चांगया निधान उपदेशिलें ॥ ३ ॥

१२ जेथें एक दुजे नाहीं । प्रपंचाचीं काहाणी तेथें कांहीं ॥१॥ तेथें कांहींच नाहीं तेथें कांहींच नाहीं । सोय धरी आपुली रे ॥२॥ वटेश्वरसुतातें बोले मुक्ताई । सोहंभावें अखंडित राहीं ॥३॥

१३ सुखाचे शेवटीं दुःख आलें भेटी । भेटलियासाठीं तेंही नुरे ॥१॥ सुख तें कवण दुःख तें कवण । दोहीं अज्ञान करीं पां रे ॥२॥ मुक्ताई म्हणे चांगया चेई । स्वयंभू चेइला वटेश्वरीं ॥३॥

१४ चांगा जन्मला माध्यान्हकाळीं । मायबापें दोन्ही नाहींशीं जालीं ॥१॥ मुळींच चांगा नाहींसा जाला । मुक्ताई म्हणे चांगया भला भला ॥ २ ॥ वटेश्वर चांगा मुळीं लागला । पोसणा घेतला मुक्ताईनें ॥ ३ ॥

१५ रूप ना छाया त्रिगुणरहित । जातिस्वरूप हें पां नित्य ॥ १ ॥ जाणें येणें नाहीं तें निर्गुण पाही । चैतन्य होईं शुद्धबुद्ध

॥२॥ मुक्ताई म्हणें चांगया वटेश्वरा । निरुता पाहे स्वयें साकारा ॥ ३ ॥

१६ भ्रमराचें मरण कमळणीपुष्पीं । तैसें योगियां सेवी शेजसुख ॥१॥ आवडीं वाल भाडोळचां सेवी देख । तैसें पाहें सुख ज्ञानदृष्टीं ॥२॥ जोडिलें सुख नवजाये । तैसा चांगा पाहे वटेश्वरीं ॥३॥

१७ पतिव्रता नारी व्यभिचार केला । परपुरुष पूजिला बाईये वो ॥१॥ पतिव्रता नारी ऐसें म्हणावें । नाम पैं ठेवावें अव्यक्तासी ॥ २ ॥ चांगा द्वैत होता तो अद्वैत जाला । सोहं शब्दीं राहिला वटेश्वरीं ॥ ३ ॥

१८ एकविससहस्त्र साश तें उच्छ्वासी । तो योगियां अभ्यासीं स्थिर स्थिर ॥ १ ॥ गमनागमन नाहीं संसार पैं नाहीं । वटेश्वरीं सोय सांगितली ॥ २ ॥ वटेश्वर चांगा जिव्हाळा । सोहं शब्दी राहिला वटेश्वरीं ॥ ३ ॥

१९ स्वप्नींचा आत्मा केउता आहे । मागुता ये हे नवल काई ॥१॥ चांगा म्हणे आहे सांग मुक्ताबाई । लटिकें साच वर्तनें देहीं ॥ २ ॥ मुक्ताई म्हणे चांगया भ्रमिष्ट देहीं । निर्धारीं राहीं स्वप्न कैचें ॥ ३ ॥

२० आकार पूजिता निराकार जालें । शून्यीं बुडालें बाईयांनो ॥ १ ॥ शून्याचा अंकुर शून्य फळलें । व्योमाकार जालें मन तेथें ॥ २ ॥ तेथें फळ ना डाळ जाति ना कूळ । वटेश्वर चांगा जाला निर्मळ ॥ ३ ॥

२१ सोहं होतें तें कोहं जालें । निज विसरलें काय सांगों ॥१॥ मार्ग चुकला विसर पडिला । वरपडा जाला विषय चोरा ॥ २ ॥ वटेश्वर चांगा ज्ञानदीपें उजळला । सोहंशब्दीं लावियला बाईयानो ॥ ३ ॥

२२ अवघीया डोळां पाहू गेलीये । तंव अवघा अवघेचि जालीय

॥ १ ॥ काय सांगों गे माये अवघाचि आहे । अवघे नसीं पाहे वटेश्वरीं ॥२॥ अवघेपणाची मज पडिली भ्रांती । अवघाचि मी संतीं सांडवलों ॥ ३ ॥ वटेश्वर चांगा अवघाचि आहे । अवधे नसीं पाहे वटेश्वरीं ॥ ४ ॥

२३ भावें भक्ति करूनी वैराग्य जोडसी । तरि तूं पावसी ब्रह्मसुख ॥ १ ॥ ज्ञानतत्त्वीं करी करी हा विचार । निर्गुणी आकार निरामय ॥ २ ॥ चांगया सोय धरी ज्ञान वटेश्वरीं । मुक्ताई जिव्हारीं बोध करी ॥ ३ ॥

२४ ऐलाड हुडाचे पैलाड हुडाचे । जागवा जागवा हरीचे ॥१॥ भले रे दास गोपाळाचे ॥ २ ॥ भक्तिबोधें बोधले साचे । चांगदेव म्हणे वटेश्वराचे ॥ ३ ॥

२५ आनंदवनीं भ्रतार होता । झुरकन उडोनी गेला केउता ॥१॥ नाम नाहीं रूप नाहीं । पाहोंगेलों तों कांहींच नाहीं ॥ २ ॥ ऋषी राहिला शब्द निमाला । वटेश्वर चांगा विस्मित झाला ॥ ३ ॥

२६ नाहीं सुखदुःख पापपुण्य नाहीं । कर्मधर्म कल्पना नाहीं नाहीं ॥१॥ नाहीं मोक्ष ना भवबंधन नाहीं ॥ २ ॥ म्हणे वटेश्वरा ब्रह्म नाहीं । सहजसिद्ध बोले मुक्ताई ॥ ३ ॥

२७ बंधन नाहीं बद्ध नाहीं । साच कीं लटिकें तेंही नाहीं ॥१॥ नाहीं भेदसी काई । साच कीं लटिकें वर्तते देहीं ॥ २ ॥ चांगा म्हणे सांगा मुक्ताबाई । साच कीं लटिकें वर्ततें देहीं ॥ ३ ॥

२८ प्रकृतीचें पूजन प्रकृतीच्या ठायीं । असतां तोही परी चोजवेना ॥ १ ॥ जळमाजीं भानु बिंबला दिसे । तैसा देहीं दिसे परमात्मा ॥२॥ पुष्पामाजीं परिमळ राहिला निश्चळ । तैसा तो अकळ लक्षा नये ॥ ३ ॥ हें बोलणें सिद्धांतींचें शेवटीं । वेदांतीं चांगया मथन केलें ॥ ४ ॥

२९ क्रोधाची आटी बांधोनियां पोटीं । सासू रयापाठीं लागतसे ॥ १ ॥ पाहा वो ईचें केवढें ढाल । आल्यासवें करीतसे बोल ॥२॥ लाज सांडोनी निःशंक झाली । पांचांही बांधिली पाठीवरी ॥ ३ ॥ चांगा म्हणे जीवींचें गुज । वटेश्वरें मज सांगितलें ॥ ४ ॥

३० मी माझें दुरित आशापाश चित्तीं । मोहो ममता भ्रांति अहंभावें ॥ १ ॥ हरितसे तेज अभिमानताठा । एकतत्त्व वैकुंठा हरिपाठें ॥ २ ॥ नाशिवंत देह पंचतत्वमोळी । वायांच वाहाटुळी उडोनि जाये ॥ ३ ॥ मुक्ताई जीवन चांगया दिधलें । निर्गुणीं साधिलें धर कैसें ॥३॥

३१ देवीं देवो जाला भावासी अबोला । निमोनि उरला आपपरें ॥ १ ॥ आधीं आप पाहीं मग पडे वाहीं । प्रपंचडोहीं बुडों नको ॥ २ ॥ जंव नाहीं कृपा गुरफळीं बापा । तंव कैसेनी दीपा पावशील ॥३॥ मुक्ताई चांगया तत्वें तत्त्व लया। हरिभावीं माया हरपली ॥ ४ ॥

३२ आकाशाचा शेंडा घार रांधी मांडा । काउळा वाढी कांदा कुल्लाळ भोजन करी ॥ १ ॥ दिसा पडे चांदणें रात्रीं पडें उष्ण । चोर घरटी घालित राळ घाली खाण ॥ २ ॥ सासूनें खादलें उंडे सून तरळे। लेकी लांसिली जांवाई गडबडा लोळे ॥ ३ ॥ धमकत घुसळण घातलें पारी । वटेश्वर सुता म्हणे मुक्ताई अवधारी ॥ ४ ॥

३३ मुक्त होतासी तो बद्धता पावसी । आपल्या दोरीं आपण बांधिलासी ॥१॥ सोय धरी मूळस्थान न सोडी । बंधन तोडी आलिया रे ॥ २ ॥ चांगा वटेश्वरीं विनवितो दातारा । वायाची संसारा आणियेलें ॥ ३ ॥

३४ मोळी विकुनि खीर वोखटी । आंबील गोमटीं बैसलीया ॥ १ ॥ कऱ्हे बारा गांवें येरझारा करी। शेखी पोटभरी कांटचांवरी ॥ २ ॥

बुड फळ लाभे तरी शेंडिया कां धावें। वाया कां भोंवतें भोंवे चांगा म्हणे ।। ३

३५ टोंकावरी टेंक त्यावरी एक टेंकुली। तेथें एक बाळी विस्मो करी ।। १ ।। तिचें नांव काय त्याचें नांव काय। विचारोनि पाहे मनामाजीं ।। २ ।। डोळियांतील बाहुली जालीसे गरुवारू। तिशीं अरुवारू सुईण मेळवा ।। ३ ।। सुईचे आणीवर रचिलें पाठार। मुक्ताई म्हणे चांगया सांग याचा विचार ।। ४ ।।

३६ पतिव्रते पुंश्चली सांगात जाला। दोहींतें भेटला एक देखा ।। १ ।। दोहींचा गुण एक जाला। निर्गुण दादुला सोहंकारु ।। २ ।। आपुला सांडिला परावा मांडिला। घराचार नासला काय सांगों ।। ३ ।। वटेश्वरीं व्यभिचार जाला। परपुरुष भुंजला शून्यें तेथें ।। ४ ।।

३७ ब्रम्हांडगोळकीं पवनाचया पालखीं। अवधूत कवतुकीं पहुडलासे ।। १ ।। बोलवीं चांगया मुक्ताई माता। ब्रम्हविद्यापर्यंते सुख देखतां ।। २ ।। डोळा लावूनी निजीं निजेला निवांत। स्वप्नीं वटेश्वर देखिला निवांत ।।३।।

३८ अविनाश पाळणा अव्यक्ता विणिला। तेथें पहुडला योगी-राज ।। १ ।। जो जो जो जो म्हणतसे माया। साकारातीत नीज रे चांगया ।। २ ।। सोहं सोहं षड्चक्रन्यासें। तुज परिये देतां मीच न दिसें ।। ३ ।। ऐसी निद्रा तुज लागो रें पुत्रा। मुक्ताई खेचरा उपदेशी मंत्रा ।। ४ ।।

३९ बाळक चुकलें सुकुमार तान्हुलें। त्यानें पैं सांडिलें माया-जाळ ।। १ ।। जो जो जो जो पुत्रातें निजवी। अनु हात वोंवी निशब्दांची ।। २ ।। मावळली दिशा वाचा पैं खुंटली। माया पैं भेटली मुक्ताबाई ।। ३ ।। मुक्ताई म्हणे नांव पैं ठेवीन। सुता बोलविव वटेश्वरा ।। ४ ।।

४० गुण ना निर्गुण शब्दातीत । तेथें तूं निश्चित बाळा निज ।। १ ।। पाळणा लाविला हृदयकमळीं । मुक्ताई जवळी साद-विते ।। २ ।। शांति क्षमा विदेह पै वर्णिती । नांव पै ठेविती अद्वैतासी ।। ३ ।। वटेश्वरसुत चांगा अवधूत । मुक्ताई शांतवीत ज्ञानद्रष्टीं ।। ४ ।।

४१ निर्गुणाचे डाहाळीं पाळणा लाविला । तेथें सुत पहूडला मुक्ताईचा ।।१। नीज नीज बाळा करीं पै आळी । अनु हात टाळी वाजवीते ।। २ ।। तेथें निद्राजाधृति भोगी पैं उन्मनी । लक्ष तो भेदुनी निजणा तो ।। ३ ।। निभ्रांत पाळीं पाळणा विणवूनी । मन हें बांधोनी पवनदोरा ।। ४ ।। एकविससहस्त्र साहाशें वेळे बाळा । तोही डोळा स्थिर करी ।। ५ ।। निद्रा ना जागृति निजसी काई । परियेदेसी चांगया बोले मुक्ताबाई ।। ६ ।।

४२ ऐकें चांगया फळ फळासी आलें । येऊनियां नासून गेलें ।। १ ।। सोडी सोडी भवाची भ्रांति । तेणें होय अज्ञाननिवृत्ति ।। २ ।। चांगा वटेश्वरीं फळला । विज्ञानफळीं परिपाका आला ।। ३ ।।

४३ मृगजळावरी मृंगियांच्या हारी । दुरूनि नारी दावितसें ।। १ ।। मूंगी लाठी मूंगी लाठी । वैकुंठींचा खुणा सांगतसे गोंष्टी ।। २ ।। मूंगीचिया गळां तुळशीचा लोहोडणा । चांगा वटेश्वर सांगतो खुणा ।। ३ ।।

४४ हेमी हेमप्रचित पाही । अनुभव आलिया सांगातें काई ।।१।। सोहंकार मन न सोडी साचें । मी नाहीं तेथें तूं कैचें ।। २ ।। अहं–तेसी सोहं तेंचि गुज । मुक्ताई म्हणे चांगया बुझ ।। ३ ।।

४५ तुझा तूं चुकलासी गिवसुनी घेई । सांगी देहवासना नाहीं तें घेई । सोहं सोहं हा घेई विचार । हें जाणतो वटेश्वर ।। २ ।। शब्दांतीत जाणोनि निरुतें । चांगया वटेश्वरीं जन्मभरितें ।। ३ ।।

४६ मुक्त होतासि तो कां बद्ध जालासी । आपल्या बंधनें आपणा बांधलासी ।। १ ।। सांडी बंधन सोय धरी गव्हारा । जाई मूळ-स्थाना आपुलिया ।। २ ।। तेथीच्या तेथें राही परि रूप नाहीं । चांगयासी बोले मुक्ताई ।। ३ ।।

--::-- समाप्त --::--

## श्री ज्ञानेश्वर महाराज यांचा गाथा

# अभंगांचा वर्णानुक्रम

## श्री निवृत्तिनाथ यांचे अभंग

**ह.**



**क्ष.**



**ज्ञ.**

# श्री सोपानदेव महाराज यांचे अभंग

# श्री मुक्ताबाईंचे अभंग



## क्षेपक अभंग

# श्री चांगदेव महाराज यांचे अभंग